वीणा प्रकाशन—२१

# डाकबंगला

गजानन त्र्यंबक माडखोलकर




जुलै १९४२ ]

[ किंमत [illegible]

प्रकाशक
ब. गो. गर्गे, एम्. ए.
वीणा प्रकाशन
सीताबर्डी, नागपूर

संपादक
ब. गो. गर्गे, एम्. ए.
द्वा. वा. घाटे, बी. ए., एल्‌एल्. बी.



मुद्रक
**पु. रा. खांडवेकर**, बी. एस्‌सी., एल्‌एल्. बी.
गोपाल प्रिंटिंग प्रेस, नागपूर.

आमचे परमस्नेही

**ॲ. वसन्त भगवन्त कर्णिक**

आणि

**सौ. विमलाबाई कर्णिक**

यांना प्रेमादरपूर्वक

समर्पण

# माडखोलकरांचीं पुस्तकें

## प्रबंध

१ आधुनिक कविपंचक
२ विष्णु कृष्ण चिपळूणकर
३ विलापिका
४ वाङ्मय-विलास
५ स्वैरविचार
६ माझे आवडते लेखक
७ अवशेष
८ आव्हान
९ माझी नभोवाणी
१० महाराष्ट्राचें हृदय
११ व्यक्तिरेखा
१२ संभावना
१३ ऋणभार
१४ चंद्रशेखर
१५ माझे आवडते कवि
१६ परामर्ष

## नाटिका

१ उर्वशी
२ शर्मिष्ठा
३ अगस्त्य
४ नाचकेत
५ एकलव्य
६ वृत्रहंता

## कादंबऱ्या

१ मुक्तात्मा
२ भंगलेलें देऊळ
३ शाप
४ कांता
५ दुहेरी जीवन
६ मुखवटे
७ नवे संसार
८ नागकन्या
९ डाकबंगला
१० चंदनवाडी
११ हें युद्ध
१२ चक्रवर्ति उदयन
१३ गोंडवन
१४ उमरा

## कथासंग्रह

१ शुक्राचें चांदणें
२ रातराणीचीं फुलें

# — वीणा प्रकाशन —

| | | |
|---|---|---|
| (२) स्वैरविचार | श्री. माडखोलकर | १- ८-० |
| (३) दोन मनें | ,, खांडेकर | २- ०-० |
| (४) कांता | ,, माडखोलकर | २- ०-० |
| (५) आविष्कार | गीता साने | १- ८-० |
| (६) हेमलता | श्री. द्वा. वा. घाटे | १- ०-० |
| (७) पांढरे ढग | ,, खांडेकर | २- ०-० |
| (८) निष्कलंक | कु. कमल दिक्षित | १- ४-० |
| (९) विशाल जीवन | श्री पी. वाय्. देशपांडे | २- ०-० |
| (१०) उषःप्रभा | ,, मांजरेकर | १- ४-० |
| (११) झंझावात | ,, बोकील | २- ०-० |
| (१२) पहिली लाट | ,, खांडेकर | १- ८-० |
| (१३) साकी | ,, बी. रघुनाथ | १- ०-० |
| (१४) मुखवटे | ,, माडखोलकर | २- ८-० |
| (१५) काळी राणी | ,, पी. वाय्. देशपांडे | २- ८-० |
| (१६) स्वीकार | ,, शरच्चंद्र टोंगो | १- ८-० |
| (१७) आव्हान | ,, माडखोलकर | १- ८-० |
| (१८) संक्रमण | ,, वरखेडकर | १- ८-० |
| (१९) धूर व इतर एकांकिका | ,, काणेकर | १- ८-० |
| (२०) सुखदुःखविवेक | ,, वऱ्हाडपांडे | २-१२-० |
| (२१) डाक बंगला | ,, माडखोलकर | १- ४-० |
| (२२) न रुळलेले मार्ग | ,, पां. वि. खांडेकर | २- ०-० |

## — आगामी —

| | | |
|---|---|---|
| (२३) साहित्य आणि संस्कृति | श्री. स. खु. देशपांडे | ३- ०- |
| (२४) माझा लढा | ॲडॉल्फ हिटलर | ३- ८-० |

| | | | |
|---|---|---|---|
| (२५) | मोंगल दरबारांतील रहस्यें | श्री. देशपांडे | २–१२–० |
| (२६) | ? | ,, उमाकांत भेंडे | २– ०–० |
| (२७) | चार भिंती | ,, खांडेकर | |
| (२८) | नवीं मूल्यें | ,, पी. वाय्. देशपांडे | |
| (२९) | नवयुगाचे सहप्रवासी | ,, प्रभाकर पाध्ये | |
| (३०) | फुलें नी काटे | ,, खांडेकर | |
| (३१) | दुसरी लाट | ,, ,, | |
| (३२) | निरंकुश | प्रो. अळतेकर | |

# — आमचीं इतर प्रकाशनें —

| | | | |
|---|---|---|---|
| (१) | धबधब्याच्या धारेंत | प्रो. पाठक | १–१२–० |
| (२) | पतितेचें हृदय | श्री. गडकरी | १– ८–० |
| (३) | कूजन (काव्य) | श्री हुताश | १– ४–० |
| (४) | शर्वरी ( ,, ) | श्री. रामभजनी | १– ८–० |
| (५) | सन १८५७ (नाटक) | ,, हंबर्डे | ०–१२–० |
| (६) | बिगारीचा बैल (,,) | ,, ,, | ०– ६–० |
| (७) | गांधीवाद | ,, मराठे | ०– ६–० |
| (८) | समाजसत्तावाद | ,, जयवंत | ०–१२–० |
| (९) | छाया (काव्य) | ,, टेकाडे | ०– ४–० |
| (१०) | कविता संग्रह (,,) | ,, कै. बोबडे | १– ८–० |
| (११) | आंदोलनें | ,, प्रधान | १– ०–० |
| (१२) | रक्त व अश्रू | ,, भावे | १– ४–० |

# निवेदन

ता २० जानेवारी १९४२ रोजीं मी ही गोष्ट लिहावयाला घेतली आणि ता. २६ मार्च १९४२ ला रामनवमीच्या दिवशीं ती लिहून पूर्ण झाली.

या गोष्टींतील स्थळ, पात्र आणि प्रसंग सर्व कल्पित आहेत.

माझे मित्र श्री. उमाकान्त भेंडे यांच्याशी गप्पा मारीत असतां, सात वर्षांपूर्वी, ही गोष्ट लिहिण्याची कल्पना मला सुचली; व नंतर तिची कथारेखाहि त्यांनीं इंग्रजींत अर्धवट लिहून दिली. म्हणून मुद्दाम या गोष्टीला त्यांची प्रस्तावना मी घेतली आहे.

ही गोष्ट आमचे बन्धुतुल्य स्नेही मुंबईचे तरुण ॲडव्होकेट श्री. वसन्त भगवन्त कर्णिक आणि त्यांच्या सुविद्य पत्नी सौ० विमलाबाई कर्णिक यांना आम्ही अर्पण करीत आहोंत. १९२२ सालच्या डिसेंबरमध्यें प्रो. रा. म. मराठे यांनीं पुण्यास श्री. कर्णिक यांच्या घरीं त्यांच्याशीं माझी ओळख करून दिली व सांगितलें कीं, " वसन्तराव हे पाठच्या भावाप्रमाणे तुमच्याशीं वागतील. " प्रो. मराठे यांचे हे उद्गार एकट्या वसन्तरावांनीच नव्हे, तर त्यांचे धाकटे बंधु डॉ. अनंतराव आणि ॲ. द्वारकानाथ यांनी व त्यांच्या कुटुंबांतील इतराहि सर्व मंडळींनी आपल्या अत्यंत प्रेमळ वर्तनानें खरे करून दाखविले. त्यांचे वडील कै. ती. काकासाहेब कर्णिक यांचा आम्हां उभयतांवर पितृतुल्य लोभ होता. १९२२-२३ सालीं पुण्यास एकाकी आणि अनिकेत असा मी राहत अस-

तांना माझ्या आयुष्यांतील त्या अतिशय विपत्तीच्या दिवसांत कर्णिकांचें ‘ आनंदीगेह ’ हाच एक मला आधार होता; व १९२९ सालीं सौ. शान्ताबाई हा हिंगण्याच्या वसतिगृहांत राहत असतां कर्णि- कांचें ‘ आनंदीगेह ’ हेंच तिचेंहि माहेर बनलें होतें. कर्णिक कुटुंबाच्या या अनन्य स्नेहऋणाची फेड करण्याच्या हेतूने नव्हे, तर त्या ऋणाविषयीं केवळ कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी ही लहानशी गोष्ट आम्ही श्री. वसन्तराव आणि सौ. विमलाबाई यांना अर्पण करीत आहोंत.

ही गोष्ट लिहात असतांना माझे डोळे पुन्हा अतिशय बिघ- डले; व वाचन आणि लेखन या दोहोंवरहि मर्यादा पडली. अशा स्थितींत ही गोष्ट लिहिली आणि छापली जात असतां श्री. ज. श्री. देशपांडे आणि श्री. मा. कृ. पारधी यांनी जी मदत केली, तिचा उल्लेख करणें अवश्य आहे.

५ मे १९४२<br>
शान्ता–निवास<br>
मॉडेल मिल्स रोड,<br>
नागपूर शहर

ग. त्र्यं. माडखोलकर

# प्रस्तावना

माझे मित्र श्री. गजाननराव माडखोलकर यांचें ज्या डाकेनें आपल्या 'डाकबंगला' या कादंबरीस प्रस्तावना लिहा म्हणून पत्र आलें, त्याच डाकेनें एका युरोपियन चित्रकार बाईचें पत्र आलें. त्यांत तिनें पुढील मजकूर लिहिला होता—

"Do you remember the pictures that you so aptly called 'modern' and 'vulgar' last year you were here? Well, I have sold them. At last I have got a man to appreciate what is 'modern' and 'vulgar'. Long live modernity and vulgarity......"

या युरोपियन बाईचें एका हिंदी तरुणाशी लग्न झालेलें आहे. दोघेही चित्रकार आहेत. वरील वाक्यें वाचल्यानंतर साहजिकच गतवर्षींचा तो दिवस आठवला. त्या दिवशीं संध्याकाळीं मी या मित्रांकडे जेवायला गेलों होतों. आमंत्रण होतें आठाचें, मी गेलों सहाला.

माझा मित्र आपल्या स्टुडियोंत काम करीत होता. त्याच्या सौभाग्यवतीनें माझें स्वागत केलें. तो येईपर्यंत वेळ काढायला म्हणून मी म्हणालों "आमचे दोस्त येईपर्यंत तुमचीं अलिकडलीं चित्रें पाहूं या ना?"

"अगदी जरूर. फारच छान सूचना," त्या म्हणाल्या.

दिवाणखान्यांत त्यांचा चित्र–संभार होता. हळुहळू त्या एक एक दाखवित होत्या. मी गोड शद्बांत प्रत्येकाचें स्वागत करीत होतों.

शेवटीं भिंतीवर फ्रेम करून लावलेल्या दोन तसबिरा त्यानीं दाखविल्या व त्या म्हणाल्या, " आतां मात्र तुमचे नेहमीचे लाघवी Compliments नकोत. खरं मत पाहिजे—"

" बाप रे ! " मी हसून म्हटलें. " खरं मत द्यायचं नाहीं हा तर माझा नेहमीचा शिरस्ता आहे. पण पाहूं तर तसबिरा. फ्रेम्स् तर फक्कड दिसतात—"

" फ्रेम्स्पेक्षां चित्रं फक्कड म्हटलीं असतींत, तर आमच्या अंगावर किती मांस चढलं असतं ! " त्या डोळे मिचकवित म्हणाल्या. " हं, मग ऐकूं द्या तुमची सडेतोड टीका. असं अळंटळं नाहीं चालायचं—"

मी बराच घुटमळलों. शेवटीं म्हणालों, " मला हीं चित्रं 'आधुनिक ' पण रूढ भाषेत ' अश्लील ' वाटतात—"

" Fine– "

त्यांच्या तोंडून उद्गार निघाला.

मी अजूनही तीं चित्रेंच पाहात होतों. एक नग्न स्त्रीचें चित्र होतें, दुसरें नग्न पुरुषाचें. पहिलें चित्रकारिणीचें, दुसरें चित्रकाराचें–माझ्या दोस्ताचें.

चित्रांत सौंदर्य, गोडवेपणा नव्हता. स्त्रीच्या चित्रांत कांहीं विशेष भाग लुसलुशीत, उठावदार, भरगोस दाखविला होता. पुरुषाच्या चित्रांत पिळदारपणा, बेछूटपणा, उन्मादकता, उन्मनस्कता यांचा भास होत होता. कल्पनेपेक्षां त्या चित्रांत वास्तवता जास्त होती. ध्येयदर्शन, सौंदर्यदर्शन किंवा अशाच कांहीं गूढगुंजनाऐवजीं त्या चित्रांत शरीरदर्शनच जास्त प्रतीत होत होतें. माणसाचें उघडें नागडें

शरीर पाहिल्यानंतर जे भाव मनांत त्या शरीराविषयीं उत्पन्न झाले असतील, तेच चित्रकारांच्या कुंचल्याने व्यक्त केले होते. म्हणूनच शरीराचे कांही आकर्षक भाग त्या चित्रांत उन्नत, उठावदार दिसत होते.

" आपल्या या चित्रांना तुमचे दोस्त ' आधुनिक ' पण रूढ भाषेंत ' अश्लील ' अशी संज्ञा देताहेत--- "

माझे चित्रकार मित्र दिवाणखान्यांत आले, त्यांना उद्देशून त्यांच्या पत्नी म्हणाल्या.

" त्याची टीका अगदी योग्य आहे, " माझे मित्र विचारपूर्वक म्हणाले. " पण मला वाटतं असल्या चित्रांच्या निर्मितिबद्दल आम्हांला दोष देण्याऐवजीं आजच्या युगालाच दोष देणं जास्त शोभेल. Probably the age is vulgar, so we are vulgar—"

" मला नाहीं समजलं तुझं म्हणणं, " मी म्हणालों.

" हीं चित्रं सोडून दे. आजच्या युवयुवतींकडे बघ. जीवनाबद्दल त्यांना जास्त आकर्षण वाटतं. वासना आणि विकार यांचं निर्दालन करण्याऐवजीं त्यांनाही अवसर देणं बरं, असं त्यांना वाटत आहे. म्हणूनच तरुण-तरुणी जवळ येत चाललीं आहेत. ' Sex-isolation ' अथवा ' Sex-suppression ' या जुन्या कल्पना ही मंडळी झुगारून देत आहेत. मन मारून शरीराचा ऱ्हास करण्याऐवजीं योग्य प्रमाणांत शरीराची भूक भागविण्याकडे त्यांचा कल होत चालला आहे. लैंगिक गोष्टींकडे बघण्याचा तरुण पिढीचा दृष्टिकोन बदलत चालला आहे "

" म्हणजे या लैंगिक क्रांतीचीं प्रतीकं म्हणजे ही तुम्हां पति-पत्नींचीं चित्रें असंच समजायचं ना ? ' मी हसून म्हणालों.

" केवळ 'प्रतीकं' निर्माण करण्यासाठीं म्हणून कांहीं आम्ही कुंचले हातांत घेतले नाहीत. पण शरीर, त्याचे विकार, वासना, भावना यांबद्दल आम्हाला विलक्षण आस्था आहे. म्हणूनच आमच्या चित्रांत 'Spiritual Symbolism' च्या ऐवजीं 'वास्तवता' आहे. कांहीं विशिष्ट भागांवर आच्छादन घालण्याऐवजीं त्यांचं चित्रण आम्ही भरदार, भग्गोस केलं आहे. आत्म्याइतकंच आम्ही शरीराला, शरीरांतील लहानसहान भागाला महत्त्व देतों. म्हणूनच शरीराचा लुसलुशीतपणा, उन्माद, रोमांच आमच्या चित्रांत प्रतीत होत आहे—"

माझा दोस्त रंगांत येऊन बोलत होता.

आणखीही तो खूप बोलत राहिला असता. पण मध्येंच मी म्हणालों, " अच्छा, बाबा ! त्याच शरीराची उत्तम जोपासना करण्यासाठी मी तुझ्याकडे चमचमीत जेवायला आलों आहे. त्याची अगोदर व्यवस्था कर. मला भूक लागली आहे—"

आमच्या संवादाला त्यामुळे खळ पडला आणि आम्ही जेवणाची वाट पाहात बसलों.

गतवर्षींचा हा प्रसंग मी इत्थंभूत जसाच्या तसा इथें दिला आहे. आश्चर्य मानाल तुम्ही या गोष्टीचें ! पण, माझ्या वरील मित्रमंडळीच्या चित्राप्रमाणेंच श्री. माडखोलकर यांच्या कांहीं कलाकृती 'आधुनिक' अतएव रूढ भाषेत 'अश्लील' आहेत, हेंच मला म्हणायचें होतें. तें नीट तुम्हा वाचकांच्या गळीं उतरावें म्हणून मी हा वर पाल्हाळ दिला. त्या चित्रांबद्दल वरील संवादांत म्हटलें आहे, तें सर्व श्री. माडखोलकर यांच्या कांहीं कलाकृतींना लागू आहे. माझ्या मित्रानें वर म्हटलें आहे, 'Probably the age is vulgar, so

we are vulgar. ' हें युगच असेल कदाचित् ' अश्लील ', म्हणून श्री. माडखोलकर हे ' अश्लील ' लिहितात. ज्या युगांत त्यांचा जन्म झाला आहे, त्या युगाचें प्रातिनिधिक असेंच वाङ्मय त्यांच्या हातून निर्माण होणार, होत आहे.

श्री. माडखोलकर यांच्या कथावाङ्मयाचे कांहीं वाचक मला म्हणतात, "श्री. माडखोलकर यांच्या ठिकाणीं कांहींतरी 'मनोविकृति' असणार खास." इतर कांहीं मंडळी म्हणतात, " जरा रंगेल आहे स्वारी. त्यामुळं भडक आहे सगळं काम त्यांच्या कादंबऱ्यांत." आणखी कांही लोक म्हणतात, " Sex-obsessed आहेत बुवा माडखोलकर—"

मला हे निरनिराळे प्रवाद ऐकून मजा वाटते, हंसू येतें. मी माडखोलकरांना गेलीं आठ वर्षे फार उत्तम ओळखतों. मी त्यांच्या सान्निध्यांत राहिलों आहे. त्यांच्याशी खूप खूप बोललों आहे. त्यांचे आचारविचार, राहणी, आवडीनिवडी, आशाआकांक्षा, विकारवासना यांचें मी फार काळजीपूर्वक अवलोकन केलें आहे. मला त्यांच्यांत ' मनोविकृति ' कधींही आढळलेली नाहीं. रंगेलपणाहि त्यांच्यांत दिसत नाही. आणि Sex-obsessed तर ते नाहीतच नाहींत. अर्थात् सर्वसाधारण माणसांतील दोष, गुण, आसक्ति, आवडी, वासना, विकार त्यांच्यांतहि आहेत. पण कोणत्याही प्रकारें ते abnormal मात्र खास नाहींत. म्हणून मला पुन्हा एकदां म्हणावेंसें वाटतें कीं, त्यांच्या वाङ्मयांत अश्लीलता असेल, तर तो त्यांचा दोष नाहीं; ते ज्या युगांत जन्माला आले आहेत, त्या युगाचा दोष आहे.

कित्येक वेळां मी श्री. माडखोलकर यांचें Robotman असें वर्णन केलें आहे. कारण सकाळीं सहा वाजल्यापासून तों रात्रीं बारा

पर्यंत त्यांचे सारे व्यवहार यंत्राप्रमाणें चालू असतात. व्यसनें त्यांचीं कबूल करायचीं तर दोनच—वाङ्मयाचें अभ्यसन आणि मानवी जीवनाचें अवलोकन. त्यांचा सारा दिवस वाचण्यांत, बोलण्यांत, लिहिण्यांत किंवा अवलोकन करण्यांत व्यतीत होतो. त्यांचें वाङ्मय म्हणजे त्यांनी जें ऐकलंय, पाह्यलंय, वाचलंय, अनुभवलंय त्याचें सारसर्वस्व आहे. त्या वाङ्मयांत जर 'रंग' दिसत असेल, 'ढंग' आला असेल, तर त्याबद्दल एवढेंच म्हणतां येईल कीं, तशा प्रकारचे प्रसंग त्यांनीं पाहिले असले पाहिजेत, तशा प्रकारची माहिती त्यांना विश्वसनीय माणसांकडून मिळाली असली पाहिजे. त्यांच्या कादंबऱ्यांतील कांहीं विशिष्ट घटना सोडून दिल्या, तर बऱ्याच सत्यावर आधारलेल्या आहेत. त्यांत अतिशयोक्ति नाहीं, विकृति नाही किंवा सत्याचा अपलापहि नाहीं.

प्रत्येक कादंबरीवर श्री. माडखोलकर किती मेहनत घेतात हें मी प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलें आहे. वृत्तकार या नात्याने त्यांना जी जी राजकीय माहिती उपलब्ध झाली आहे, तिचा तर त्यांनीं आपल्या कादंबऱ्यांत उपयोग करून घेतला आहेच. पण इतर घटनाप्रसंगांची जमवाजमव करण्यासाठीं सुद्धा त्यांना खूपच सायास पडले आहेत. इंग्रजी खान्याचीं वर्णनें द्यावयाचीं आहेत, म्हणून स्वतः मांसाहार घेत नसतांहि अनेकदा ते माझ्याबरोबर इंग्रजी हॉटेलांत जेवण्यास आले आहेत. साड्या, पातळें यांचीं वर्णनें द्यावयाचीं आहेत म्हणून त्यांनीं अनेक वस्त्रें हाताळलीं आहेत. बंगल्यांचीं वर्णनें देण्यासाठी त्यांनीं कित्येक बंगले आंतून बाहेरून फार काळजीपूर्वक पाहिले आहेत. निरनिराळ्या लोकांचे आचारविचार वर्णन करावयाचे आहेत, म्हणून ते त्या त्या लोकांत कांहीं दिवस मिळून मिसळून राहिले

आहेत. आणि या त्यांच्या मेहनतीमुळेंच त्यांची प्रत्येक कादंबरी सदोष असली तरी नवीन वातावरणानें भरलेली, नवीन घटना-प्रसंगांनी रंगविलेली तुम्हांला दिसेल. त्यांत तेच तेच सिद्धांत, त्याच त्याच घटना किंवा कंटाळवाणी पुनरुक्ति सांपडणार नाहीं. "माझ्या माहितीचा, अवलोकनाचा आणि वाचनाचा सांठा कमी होऊं नये म्हणून माझी धडपड नेहमी चालू असते. तरी पण, उमाकांत, मला सारखी भीति वाटतेच कीं, आता पुढल्या कादंबरीकरितां माझ्या साठ्यांत कांहीं शिल्लक राहील कीं नाहीं ?" श्री. माडखोलकर मला कित्येकदां म्हणाले आहेत. "मी चाळिशीकडे आतां आलों आहे. अजून दहा पंधरा वर्षें तरी मला माझी लेखणी खाली ठेवतां येणार नाहीं. तोंपर्यंत सारखे मला नवे अनुभव मिळाले पाहिजेत, नवीन माहिती उपलब्ध झाली पाहिजे, बदलत्या परिस्थितीचं आकलन झालं पाहिजे, नवीन पिढीशी समरस होतां आलं पाहिजे. तरच माझ्या कादंबऱ्या वाचल्या जातील. मी आपल्या परतंत्र, अवनत समाजाला कांहीं नवीन सांगू शकेन" अशी आहे माडखोलकरांची आस्था. म्हणूनच तुम्हाला त्यांच्या प्रत्येक कादंबरींत तजेलदारपणा, नवीनपणा, आकर्षकता आढळून येते.

हा तजेलदारपणा वा नवीनपणा कायम राखण्यासाठीं श्री. माडखोलकर यांनी जी खबरदारी घेतली आहे, त्यांत विशेष नमूद करण्यासारखी गोष्ट म्हणजे तरुण पिढीशी दृढ स्नेहसंबंध. पंधरा पासून तीस पर्यंतच्या वयाचे अनेक तरुण या नाहीं त्या कारणाने त्यांच्याकडे सारखे येत असतात. यांत शाळकरी आहेत, कॉलेजचे विद्यार्थी आहेत, वकील, शिक्षक, कारकून, धंदेवाले, नानाविध लोक आहेत. कांहीं थोड्या मुलीही त्यांच्याकडे मी पाहिल्या

आहेत. पण फार थोड्या. तरुण विद्यार्थ्यांचा मात्र भरपूर भरणा त्यांच्याकडे सदैव हजर असतो. त्यांच्या स्नेहसंबंधामुळेंच तरुण पिढीच्या जीवनाशी श्री. माडखोलकर हे समरस होऊं शकतात. त्यांच्या आशा–आकांक्षा, उन्नति–अधोगति, प्रेम-वैराग्य, स्वतंत्र–स्वैर वागणूक ते बरोबर जाणूं शकतात आणि त्यांचीं योग्य चित्रें आपल्या कथांमध्यें रेखाटूं शकतात. श्री. माडखोलकर यांच्या कांहीं कादंबऱ्यांतील तरुणतरुणींत जो एक कामुक उन्माद दिसून येतो, तरुणांच्या अधःपातांचीं जीं हृदयस्पर्शी वर्णनें आलीं आहेत आणि तरुणतरुणींच्या वर्तनांत जो अनेक प्रकारचा बेछूटपणा असतो, तो त्यांनी प्रत्यक्ष पाहिला आहे, त्याचें प्रत्यंतर त्यांना आलें आहे, तसले प्रसंग घडलेले त्यांना विश्वासानें सांगण्यांत आलेले आहेत. तरुण पिढीशी हा जो श्री. माडखोलकर यांचा जिव्हाळ्याचा संबंध आहे, त्यामुळेंच ते त्या पिढीचे आवडते लेखक आहेत. आणि तरुण पिढीच्या प्रेमामुळें पुढेही श्री. माडखोलकर यांच्याकडून तरुणांचीं सुखदुःखें, ध्येयें, प्रश्न व जीवन यांवर आणखी जास्त लिखाण झाल्यावाचून राहणार नाहीं.

श्री. माडखोलकर यांच्या स्वभावांतील आतिथ्यतत्परतेमुळेंहि त्यांच्या कादंबरीलेखनाला फार फायदा झाला आहे. त्यांच्या घराला मी विनोदानें नेहमीं Observatory म्हणतों. या घरांत श्री. माडखोलकर अनेकांना पाचारण करतात. नाना धंद्यांतील आणि नाना प्रकारची मंडळी त्यांच्याकडे उतरतात. त्यांच्या मित्रमंडळींत महारापासून मुसलमानापर्यंत आणि मारवाड्यापासून युरोपियनापर्यंत सर्व जातींचे आणि धर्मांचे स्त्रीपुरुष आहेत. या मंडळीचा राबता नेहमीं त्यांच्या घरीं असतो. याचा फायदा म्हणजे सूक्ष्माव-

लोकनाला अमर्याद अवसर. ही आतिथ्यतत्परता श्री. माडखोलकरांत नसती, तर त्यांच्या कादंबऱ्यांतील विविधतेला आपणाला मुकावें लागलें असतें. श्री. माडखोलकर घरींच बसतात, सर्व जग आपल्या पायांशी आणतात आणि गोड गोड गप्पांची 'पुंगी' वाजवून येणाऱ्या जाणाऱ्यांचीं 'गुपितें' आणि 'इंगितें' मोठ्या सफाईनें काढून घेतात. हींच 'गुपितें' आणि 'इंगितें' फेरफार करून, नवीन मुलामा चढवून, त्यांच्या कादंबऱ्यांत विखुरलेलीं सांपडतात.

शुक्रवार तलावावरील त्यांच्या टुमदार बंगल्यांतील वरच्या मजल्यावरील खोलींत बसलें कीं, शहराकडून बर्डीकडे जाणारी सडक लांबवर दृष्टीस पडते. या खोलींत मी कित्येक वेळेला तास न् तास बसून सडकेकडे पाहात राहिलों आहे. अनेक गोष्टी मला येथें बसून दिसल्या आहेत. माडखोलकरांनीही या खोलींत बसून अनेक गमती अनुभवल्या असतील. ही त्यांच्या घराची ठेवण आणि ती समोरची सडक-ती मला Symbolic वाटते. तेंच तें घर. तीच ती खिडकी. पण समोरची सडक मात्र—जीवनसडक. या जीवनसडकेवरच्या 'दृश्यां'चें श्री. माडखोलकर सारखें अवलोकन करताहेत, तेथील नित्य बदलणारे देखावे आपल्या स्मृतिपटावर कोरून ठेवत आहेत आणि केव्हां ना केव्हां या जीवन-पथावरील अनुभूति ते आपल्या कथांत गुंफीत आहेत, हें अगदीं नक्की ! श्री. माडखोलकरांनी आपला बंगला मुद्दामच असा बांधला असावा कीं, त्यामुळें जगत् आणि जीवन त्यांच्या डोळ्यांसमोर सतत असावें.

'डाकबंगला' या कादंबरीचा पूर्वेतिहास मनोरंजक आहे. प्रवासांत नागपूरला मी त्यांच्याकडेच उतरत असे. एकदां त्यांनीं मला विचारलें, "प्रत्येक ठिकाणीं अशी तुमची सोय आहे कां हो?"

मी म्हटलें, “ नाही—”

“ मग कशी काय व्यवस्था करून घेतां एकंदर ? ” ते पुन्हा विचारते झाले.

“ प्रवाशांसाठी हॉटेल, धर्मशाळा नाही तर डाकबंगला आहे कीं प्रत्येक ठिकाणीं— ”

“ डाकबंगला ? ” ते उद्गारले. त्या शब्दाबद्दल विशेष औत्सुक्य त्यांना वाटलेंसें मला दिसलें.

“ म्हणजे हें काय गौडबंगाल आहे हो ? ”

त्यांनीं विचारलं.

“ होय ! ” मी म्हणालों, “ तें गौडबंगालच आहे एक. तसं पाहिलं तर सरकारी नोकरांसाठीं ती सोय आहे. पण आम्हां वाटसरूंना पण आमची तेथे पैसे देऊन सोय लावून घेतां येते. डाकबंगल्याचं थोडक्यांत वर्णन द्यायचं म्हणजे बड्या युरोपियन आणि हिंदी अधिकाऱ्यांचं आणि व्यापारी प्रतिनिधींचं तें सुखनिधान तर आहेच. पण त्याशिवाय स्वैर संचारांना आणि रंगेल लीलांना सुद्धा तिथे भरपूर वाव मिळतो. कांही कांही डाकबंगले म्हणजे तर या प्रकारांचे अड्डेच बनले आहेत—”

त्यानंतर कांहीं दिवसांनी श्री. माडखोलकर मला म्हणाले, “उमाकांत, लवकरच मी ‘डाकबंगला’ ही कादंबरी लिहिणार आहे.”

मला आश्चर्य वाटलें. अजूनही त्यांनी डाकबंगला पाहिलेला नव्हता. अजूनपर्यंत त्यांनी ‘ डाकबंगला आख्यायिका ’ ऐकल्या नव्हत्या. तरीपण त्यांचा निर्धार झाला होता. प्रकाशकांनी आगामी प्रकाशन म्हणून ‘ डाकबंगला ’ जाहीरही केला. कथानकाची

जुळवाजुळव होण्यापूर्वीच कादंबरीचें नामकरण झालें होतें. भलतीच धडाडी !!!

पुढें एकदां श्री. माडखोलकर मला म्हणाले, " उमाकांत, तुम्ही मला ' डाकबंगला आख्यायिका ' सांगायच्या. त्यांतली मला पटेल ती मी उचलीन आणि त्यावर माझ्या डाकबंगल्याची उभारणी करीन—"

मी म्हटलें " ठीक— "

बऱ्याच डाकबंगल्यांच्या आख्यायिका मी त्यांना तोंडी सांगितल्या. शेवटीं एक लिहूनही दिली. तीच त्यांना पसंत पडली. सजीव माणसांच्या गोष्टी मी निर्जीव शब्दांत सांगितल्या. कारण मी कथाकार नाही. पण त्यांतलि एक निवडून आपल्या लेखणीच्या सामर्थ्यानें त्यांनीं जीवंत शब्दांत एका हतभागिनीचें हृदयस्पर्शी, रोमांचकारी असें ' चारित्र्य ' निर्माण केलें आहे. ही कथा म्हणजेच माडखोलकरांचा ' डाकबंगला. '

म्हणजे सूचना मात्र माझी. बाकी सर्व कलात्मक लेणें, प्रसंगांची मांडणी माडखोलकरांची.

आणखी एक गोष्ट लक्षांत असू द्या. ज्या दिवशीं डाकबंगल्यासंबंधीं माझ्याशी ते बोलले, त्या दिवसापर्यंत ते थोडे अनभिज्ञ होते. पण एकदा त्यांनीं ' डाकबंगला ' ही कादंबरी लिहिणार असा निर्धार केला मात्र, मग लागले ते नेहमीच्या त्यांच्या पद्धतीप्रमाणें त्या विषयाचें सांगोपांग अभ्यसन करायला. त्यांनी अनेक डाकबंगले पाहिले असतील, खानसामे आणि चौकीदार यांचें मार्मिक अवलोकन केलें असेल, घटना–प्रसंगांची जुळवाजुळव केली असणार आणि शेवटीं आपली पूर्ण तयारी झाल्यानंतर कादंबरी लिहून

काढली असणार. कादंबरीचें नामकरण आणि कादंबरीचें लिखाण यांच्यांत जवळजवळ सात वर्षांचा अवधी गेला आहे. यावरून तुम्ही पहा त्यांनी सगळी सांगड जुळविण्यास किती वेळ घेतला! या काळांत त्यांनी दुसरें कांहीं केलें नाही, असें माझें म्हणणें नाहीं. खूप इतर लिखाण केलें. पण या सर्व गोष्टी चालू असतांनाच 'डाकबंगल्या'संबंधींचें मनन--अभ्यसन–चर्चा चालू होती. म्हणूनच God-father म्हणून या कादंबरीच्या प्रकाशन--दिवशीं मी पेढे वाटीन हवे तर; पण तिचे निर्माते मात्र श्री. माडखोलकरच आहेत.

'डाकबंगला' ही एक दीर्घ कथा आहे. तींत एका हत-भागिनीचें चरित्र फार हळुवार हातानें रंगविलेलें आहे. सुरवातीलाच कथानक वाचकाच्या मनाला धक्का देतें. जसजसा कथानकाचा विकास होतो, तसतशी दुर्दैवी कांचनबद्दल सहानुभूति उत्पन्न होते आणि शेवटीं तिच्याबद्दल अनुकंपा वाटूं लागते. कथेची उभारणी फारच हृदयस्पर्शी आहे. डाक-बंगला आणि सभोंवारचा प्रदेश यांचीं वर्णनें मोहक आहेत.

स्त्री--जीवनांतील एक मार्मिक गोष्ट श्री. माडखोलकरांनीं अतीव सुंदर रीतीनें रेखाटली आहे. एक सरळ गोष्ट सहजतेनें, सरळ शब्दांत सांगितली आहे. ज्या ज्या ठिकाणीं रूढ दृष्ट्या 'अश्लील' वर्णनांचे प्रसंग आले आहेत, त्या त्या ठिकाणीं माडखोलकरांनी विलक्षण संयम आणि सूचकता दाखवली आहे. उत्तान शृंगाररसाला विवेकाची जोड दिली आहे.

यापेक्षा मी कथानकासंबंधीं जास्त लिहूं शकत नाहीं. मी टीकाकार नाहीं. वाचक, कादंबरीचा पहिला वाचक या नात्यानें मला जें वाटलें, तें प्रांजलपणें मी लिहिलें.

वाचक या नात्यानेच हें माझें ' वक्तव्य ' आहे. प्रस्तावना लिहिण्याचा माझा अधिकार नाही. श्री. माडखोलकर मला प्रस्तावना लिहा म्हणाले, त्या वेळीं मी त्यांचें म्हणणें लगेच कबूल केलें. हेतु हा कीं, एका वाचकाला श्री. माडखोलकर यांचें व्यक्तिमत्त्व व वाङ्मय याबद्दल काय वाटतें, तें लिहिण्याची सुसंधि मिळावी.

श्री. माडखोलकर यांच्यासारख्या संयमी वृत्तीच्या सुशील आणि मानी माणसाच्या कादंबऱ्यांत शृंगाररसाच्या थोड्या गडद छटा आल्या, तर, मला वाटतें, एवढें बुजून जाण्याचें कांहींच कारण नाही. वर मी म्हटल्याप्रमाणें तो त्यांचा दोष नाहीं. असलाच कुणाचा दोष, तर तो तें ज्या युगांत जन्माला आले आहेत, त्या युगाचा आहे. आजच्या युगांतील तरुण पिढी इंद्रिय-दमन, विकार-रहित, वासना-रहित जीवन कांहीं जाणत नाही. उघडपणें सर्व व्यवहार असावे, उगाच फाजील दडपण नको, असें त्यांना वाटतें. कुठल्याही गोष्टीवर जास्त निर्बंध ठेवले कीं कुतहूल जास्त. त्यापेक्षा खुलें वातावरण समतोल वर्तनाला जास्त पोषक. आज रूढ होत चाललेल्या खुल्या, स्वतंत्र वातावरणामुळे तरुण पिढींत एक प्रकारचा समतोलपणा येत चालला आहे. त्यांच्यापुढे श्री. माडखोलकरांच्या उत्तान भासणाऱ्या, उन्मादक कथा टाकल्या, तरी त्याचा विपरीत परिणाम होईलसें मला तरी वाटत नाहीं.

अश्लीलतेंतही सत्य आहेच. तेव्हां कांहीं तरीच अश्लीलतेचें काहूर उठवून उगाच कोंदट वातावरण आपल्या सभोंवार निर्माण करायचं कशाला ? जीवनांत आणि जीवनांतील अनेक रसांत—यांत शृंगाररसही आलाच-तरुणतरुणी जर पूर्वीपेक्षां जास्त आशावादीपणानें आणि खुल्या दिलानें मन घालीत असतील, तर त्यांची प्रगति योग्य मार्गानें होत आहे,

असेंच मी म्हणेन. या मार्गानेच तरुण-तरुणींमध्ये विशेष मोकळेपणा येईल. निकट सहवास, संभाषण व खेळ यांमुळे एकमेकांबद्दल प्रेम आणि आदर वाढून, आमच्यांत जो लैंगिक समतोलपणा आज नाही तो उत्पन्न झाल्यावाचून राहणार नाहीं.

श्री. माडखोलकर यांना मी 'आधुनिक' पण रूढ भाषेत 'अश्लील' म्हणतों, तो त्यांचा गौरव आहे. कारण कुठल्याही युगांत प्रागतिक आणि द्रष्ट्या कलाकारांना या दोन शब्दांचाच अहेर मिळालेला आहे

मुंबई
४ मे १९४२

**उमाकांत भेंडे**

# डाकबंगला

## १

ढीवरांनीं तें प्रेत पाण्यांतून बाहेर काढून तलावाच्या कांठावरील एका दगडाला टेकून ओठंगतें ठेवलें.

त्याबरोबर प्रेत बाहेर निघण्याची इतका वेळ उत्कंठेनें वाट पहात असलेले लोक धांवतच जवळ आले आणि त्यांनीं त्या शवा-भोंवतीं गराडा घातला.

क्षणमात्र सगळे अगदीं स्तब्ध उभे होते. नंतर त्यांच्यांपेकीं एकाच्या तोंडून उद्‌गार निघाला—

" अरेरे, ही तर कांचनबाई !—"

" कोण कांचनगौरी ? आपल्या त्या खाणमालकाची सून ? "

त्याच्या मागें उभ्या असलेल्या इसमानें पुढें येऊन न्याहाळीत विचारलें.

" हो. शंकाच नाहीं—"

" बरोबर आहे. ती इथं या डाकबंगल्यांत येऊन राह्यली, म्हणजे तिच्या सरबराईचा ठेका तुझ्याकडे असे नाहीं का ? तेव्हां तुझ्या ओळखींत कांहीं चूकभूल होण्याचा संभव नाहीं—"

" नक्की तीच रे ! काल संध्याकाळींच डाकबंगल्यावर गेलों होतों मी तिला भेटायला. अद्याप पुरते चोवीस तासहि झाले नाहींत तिला पाहून. तोंडावरली कांति कशी कायम आहे अगदीं ! "

" पण तिला जीव द्यायला काय झालं रे एवढ्या तरुण वयांत ? संपत्ति, मुलंबाळं, मानमान्यता—काय कमी होतं तिला ? "

" संपत्ति न् मुलं घेऊन काय करतोस नुसतीं ? नवरा नव्हता ना ? न् शिवाय तो तसला सासरा—"

" नवरा नसला म्हणून काय झालं ? दर वर्षीं दिवाळीनंतर या डाकबंगल्यांत ती रहायला आली, म्हणजे कुणीतरी नवा देखणा जवान असायचा तिच्याबरोबर—"

" अरे, हळू बोल ! कुणी ऐकेल उगाच! तो बरोबर इसम असे ना, तो दिवाणजी तिचा—"

" दर वर्षीं बदलत असे वाटतं दिवाणजी ? तुझ्यासारखा ठेकेदार चालत असे तिला वर्षा न् वर्ष; न् दिवाणजी मात्र नवा लागत असे दर साल ! मोठा इमानदार दिसतोस खाल्ल्या मिठाला इतक्या आपुलकीनं जागायला—"

" तसं नव्हे रे ! मृताविषयीं वाईट बोलूं नये उगाच. बिचारी हिवाळ्याच्या आरंभीं इथं येऊन या डाकबंगल्यांत राहयली, म्हणजे चैन असे आसपासच्या खेडुतांची—"

" खेडुतांची चैन होती कीं नाहीं कोण जाणें. पण तुझी चंगळ होती यांत मात्र संशय नाहीं. चोपट दरानं तिला भाजीपाला, फळफळावळ न् इतर माल विकून तूं वर्षाची कमाई महिन्याभरांत करित होतास, लेका ! पण काय रे, हिनं जीव का दिला असेल ?—"

" आपण कसं सांगणार तें ? न् जीव दिला हें तरी कशावरून ? ती रोज सकाळ संध्याकाळ पोहायला जात असे. वेलीबिलींत पाय अडकून बुडाली असेल—"

" अरे, अपघात झाला असता, तर आरडाओरड नसती का झाली ? डाकबंगल्यांतला तुझा दोस्त तो चौकीदार न् तो खानसामा हे स्वस्थ बसले असते का तिला झालेला अपघात मुकाट्यानं पहात ? छे, अपघात नव्हे हा. पहांटे केव्हां तरी जीव दिला असला पाहिजे तिनं. आतां होईलच चौकशी दरोगासाहेब आल्यावर—"

" मलाहि वाटतं एकदां हिनं जीव दिला असावा असं. दुपारीं ढीवर मासे पकडायला आले, तेव्हां त्यांना पाण्यावर कांहींतरी तरंगत आहेसं दिसलं. त्यांनीं वर्दी दिल्यामुळं चौकीदार नि मी इथं आलों. तरी सुद्धां ही कांचनबाई असेल असं स्वप्नांतहि आलं नाहीं आमच्या—"

" असं कसं म्हणतोस तूं ? चौकीदाराला तरी कल्पना असायला हवी होती ती डाकबंगल्यांतून नाहींशी झाल्याची—"

" कशी कल्पना असणार ? ती वाटेल तेव्हां येणारी न् वाटेल तेव्हां जाणारी तालेवार, लहरी बाई. सकाळीं खानसामा चहा घेऊन जातो, तों खोलींत कोणी नाहीं. त्याला वाटलं, बाई गेली असेल फिरायला, मासे पकडायला किंवा आपल्या बंगल्यावर खेळायला. हा असा कांहीं विचित्र प्रकार घडला असेल, हें कोणाच्या मनांत येणार ? ढीवर जेव्हां सांगत आले, तेव्हां मला वाटलं, कोणा खेडुत बाईनं सासूच्या किंवा नवऱ्याच्या

जाचाला कंटाळून जवळ केला असेल तलाव ! नाहीं तरी आपल्या या रामसागराला वर्षाकांठीं चार पांच बळी लागतातच—”

तो हें बोलत आहे, तोंच चौकीदार त्याच्या कानाला लागला.

त्याबरोबर तो प्रेताभोंवतीं जमलेल्या घोळक्यांतून मागें हटून म्हणाला—

“ दरोगासाहेब वर डाकबंगल्यावर आले आहेत. ते येताहेत पंचनामा करायला—”

आणि जमादारानें लोकांना पांगावयाला सुरवात केली.

## २

काल सकाळीं कांचन जेव्हां त्या डाकबंगल्यांत मुक्कामाला आली, तेव्हां तिच्या स्वप्नांतहि आलें नसेल कीं, तो आपल्या आयुष्यांतला शेवटचा दिवस ठरणार.

त्या डाकबंगल्याविषयीं तिला एक प्रकारचें विशेष आकर्षण होतें. आणि खरोखरी कोणालाहि आकर्षक वाटावा असाच तो डाकबंगला होता.

एकाला एक भिडलेल्या अशा त्या तीन उंचसखल टेकड्या आगगाडींतून पाहिल्या, म्हणजे जमिनीवर रवंथ करित बसलेल्या उंटाची आठवण होत असे. सकाळच्या कोंवळया उन्हांत त्या झाडींनें आच्छा-

दिलेल्या तांबुस टेकड्या हिरव्या किनखापाची झूल अंगावर घातलेल्या बादशाही लवाजम्यांतल्या उंटासारख्या दिसत; तर सायंकाळीं संधिप्रकाशांत त्यांची अवाढव्य धूसर निळी रेषाकृति बघून स्वर्गांतला हा दिग्गजच चुकून भूतळावर आला असावा, असा भास होत असे. विशेषतः नवमीच्या छायासंमिश्र चांदण्यांत त्या तीन टेकड्यांपैकीं मधल्या टेकडीवर असलेलें प्रभु रामचंद्राचें पुरातन शुभ्र मंदिर हें त्या दिग्गजाच्या पाठीवर चढविलेल्या चांदीच्या सुंदर अंबारीसारखें दिसत असे.

त्या तीन टेकड्यांपैकीं पहिली ढुबरी टेकडी कांचनच्या सासऱ्याच्या मालकीची होती.त्या टेकडींत ज्या मॅंगनीजच्या खाणी सांपडल्या होत्या, त्यांच्या जोरावर अगणित पैसा कमावून मुंबईच्या भांडवलवाल्यांत त्यानें प्रमुख स्थान संपादन केलें होतें. टेकडीपासून चार पांच मैलांच्या अंतरावर नदीकांठीं त्याचा प्रशस्त बागबंगला होता; व हिंवाळ्यांत दीड दोन महिने त्याचा मुक्काम बहुधा त्या बंगल्यांतच असे. पण खनिज मालाची उलाढाल करणाऱ्या त्याच्या कंपनीची मुख्य कचेरी मात्र मुंबईसच होती. इतकेंच नव्हे, तर त्याचें रहाणेंहि महालक्ष्मीवरील आपल्या मोठ्या थोरल्या बंगल्यावरच अलीकडे किती तरी वर्षे असल्यामुळें, मुंबईपासून शेंकडों मैल दूर असलेल्या या लहानशा गांवांतल्या टेकडीच्या कुशींतून आपलें तें बादशाही विलासवैभव पैदा झालें आहे, याची जाणीव त्याची त्यालाहि आतां फारशी उरली नव्हती. पंचवीस वर्षांपूर्वी त्या खाणीचा सारा कारभार तो स्वतः जातीनें पहात असे. पण, गेलीं पंधरा वर्षे एका अँग्लोइंडियन तज्ज्ञाच्या हातीं त्यानें खाणीच्या देखरेखीची सर्व सूत्रें दिलीं होतीं; व हरएक बाबतींत त्याचा शब्द तो प्रमाण मानून चालत असे. तो निमगोरा, रगेल, लालबुंद व्यवस्थापक हाच खरोखरी आतां त्या खाणीचा मालक होता; आसपासच्या गांवांतले जे अडीच तीन

हजार स्त्री-पुरुष मजूर त्या खाणींत रात्रंदिवस राबत, त्यांच्यावर त्याचें अनियंत्रित प्रभुत्व होतें; व संप होऊं न देण्याच्या त्याच्या अजब हातोटी-मुळें मजुरांच्या जीविताइतकींच आपल्या मालकाच्याहि मनावर तो हुकमत गाजवीत असे.

तो डाकबंगला त्या तीन टेकड्यांपैकीं शेंवटल्या टेकडीवर होता. पहिल्या टेकडीवर त्या मँगनीजच्या खाणी, मधल्या टेकडीवर तें भव्य राममंदिर आणि शेवटल्या टेकडीवरला तो झाडींत लपलेला डाकबंगला—भारतीय जीवनाच्या तीन विशेषांचीं तीं प्रतीकेंच होतीं जणुं कांहीं.

त्या डाकबंगल्याच्या व्हरांड्यांत टेवलेल्या वेताच्या खुर्चीवर बसलें, म्हणजे त्या दोन टेकड्यांच्या पायथ्याशीं पसरलेल्या रामसागराचा रम्य विस्तार आपल्या नील लहरींनीं डोळ्यांना आनंद देत असे; व मागल्या बाजूच्या बगीचांत जाऊन उभें राहिलें, म्हणजे मावळत्या सूर्याच्या प्रकाशांत खालच्या मैदानांत जागोजाग असलेले पांढरे शुभ्र तलाव आणि हिरवेगार पानमळे हे हिऱ्याच्या आणि पाचूच्या पदकांचा भास उत्पन्न करित असत. शरदृतूंत आकाशाच्या कोपऱ्या कोपऱ्यांतून सांजसकाळ उगाचच गर्दी करून राहणाऱ्या कोरड्या ढगांच्या रंगीबेरंगी सांवल्या जेव्हां रामसागराच्या पाण्यावर पडत, तेव्हां असें वाटे कीं, हा जलाशय नसून शारदश्रीनें रेशमाचें तलम कोरें वस्त्रच जणुं प्रथमच धुवून भुईवर वाळत घातलें आहे.

वाऱ्याच्या झोताबरोबर हेलावणाऱ्या रामसागराच्या लाटांचा गंभीर घोष आणि धरणांतून खालीं मैदानांत घरंगळत वहात जाणाऱ्या त्याच्या नहराची गोड खळखळ—मानवी शब्दानें अदूषित अशी गाढ नादमय शांति त्या डाकबंगल्याभोंवतीं नांदत होती.

कांचननें त्या डाकबंगल्याचें सौंदर्य तिन्ही ऋतूंत अनुभवलें होतें. पावसाळयांत जेव्हां रामसागर तुडुम्ब भरून सागरासारख्या गर्जना करी आणि जेव्हां पलिकडलें मैदान म्हणजे जणुं दुसरा रामसागर होऊन जात असे, तेव्हां त्या टेकडीच्या दोहों बाजूंना लांबच लांब पसरलेल्या जळविस्ताराच्या सपाटीवर असंख्य बुडबुडे उत्पन्न करित वरसणाऱ्या पावसाच्या सरी पहाण्यांत तिला जितकी मजा वाटे, तितकाच आल्हाद, उन्हाळयांत आटत आलेल्या रामसागराचा करुण कलरव जेव्हां मत्त कोकिळांच्या वासंतिक वातावरणाला कंपित करणाऱ्या भेदक कंठर-वांत मिसळून कानांवर येत असे आणि चांदण्या रात्रीं जेव्हां खालच्या मैदानांतले कोरडे पडलेले जलाशय आणि तगमगणारी जमीन यांच्या उष्ण निश्वासांची झळ घेऊन वर येणाऱ्या वाऱ्याच्या किंचित् गार, किंचित् गरम झुळका शरीराला स्पर्श करित, तेव्हां तिच्या मनाला होत असे. आणि शरदापासून शिशिरापर्यंत हिवाळा प्रथम झाडांच्या पानांचा रंग बदलीत, नंतर त्यांच्या फांद्या फांद्यांतून धसमुसळेपणानें खेळत आणि शेवटीं आपल्या निर्दय, पिसाट सोसाट्यानें त्यांना झोडपून काढीत त्या टेकड्यांवर आणि जलाशयांवर जें तांडव नृत्य करित असे, तेंहि तिनें, कडकलक्ष्मीचा नाच भयचकित मनानें पहाणाऱ्या मुलाप्रमाणें, सभय उत्कंठेनें बघितलें होतें.

आणि तितकाच आनंद त्या डाकबंगल्याच्या व्हरांड्यांत बसून तिला तिन्ही ऋतूंतलें आकाश पहातांनाहि व्हावयाचा. पावसाळयांतला सौम्य प्रसन्न, हिवाळयांतला मंद रखरखीत आणि उन्हाळयांतला प्रखर धगधगीत सूर्य आकाशाला जी प्रसन्नता, धूसरता आणि गाढता आणतो व रात्रीं निबिड अरण्यांतील पाणवठ्यावर येणाऱ्या श्वापदांच्या गटांप्रमाणें नक्षत्रांचे पुंज ज्या नीरव पण अखंड गतीनें पूर्वेकडून पश्चिमेकडे जातात, आणि त्याहिपेक्षां चंद्र केव्हां पूर्वक्षितिजावर तर केव्हां पश्चिम क्षितिजावर

एक एका नक्षत्राच्या योगतारेसह प्रवास करून पुनवेच्या रात्रीं या बाजूचा रामसागर आणि त्या बाजूचें तें मैदान ज्या धवल सुषमेनें भरून टाकीत असे, तें आकाशांतील दिव्य तेजांचें निःशब्द गतिसौंदर्य— तेंहि तिनें डोळे भरून पाहिलें होतें.

वास्तविक तिचा स्वतःचा स्वतंत्र बंगला सासऱ्याच्या बंगल्यापासून मैल सव्वा मैल अंतरावर नदीकांठीं बांधलेला होता. ती मुंबईहून आली म्हणजे प्रथम त्याच बंगल्यांत उतरत असे. पण हौसेनें आणि निवास-स्वातंत्र्याच्या लालसेनें बांधलेल्या त्या नदीकांठच्या टुमदार बंगल्यापेक्षां त्या डाकबंगल्यांत येऊन रहाणेंच तिला फार आवडत असे. आठवड्यां-तून दोन दिवस तरी तिचा मुक्काम त्या डाकबंगल्यावर असावयाचा. एकादा बडा युरोपियन किंवा हिंदी अधिकारी डाकबंगल्यांत उतरलेला असला, म्हणजे मात्र ती चुकूनहि त्या बाजूला फिरकत नसे; व ती तिथें रहात असतां जर कोणी सरकारी अगर अन्य पाहुणा अकस्मात् आला, तर ती लगेच मोटारींतून परत आपल्या बंगल्यावर जावयाची. एकांत, मानवी संसर्गानें अदूषित असा एकांत हेंच जणुं त्या डाकबंगल्याचें तिला एकमेव आकर्षण वाटत असे.

त्या दिवशीं सकाळीं चहा पीत असतां एकदम तिची तेथें जाण्याची लहर लागली; व लगेच मोटार काढावयाला तिनें शोफरला सांगितलें.

ती निघाली, त्या वेळीं हवेंत गारवा बराच होता. पण, आठ नऊ मैलांचें तें अंतर तोडून डाकबंगल्यावर पोंचेपर्यंत शरदृतूंतील कडक उन्हानें आपली तिरीप दाखवावयाला प्रारंभ केला.

तिच्या मोटारीच्या कर्ण्याचा आवाज, त्याच्या चाकांची विशिष्ट घरंगळ चौकीदाराच्या सरावाची होती. तो आवाज कानांवर पडतांच,

कुत्रा जसा शेपटी हलवीत मालकाच्या अंगावर झेंप टाकण्यासाठीं उड्या मारित जावा, त्याप्रमाणें चौकीदार धांवत आला आणि त्यानें अदबीनें सलाम करून मोटारीचें दार उघडलें.

" कोणी मेहमान आहे ?—"

" नाहीं बाईजी—"

" ठीक—"

ती गाडींतून झटकन् खालीं उतरतांना उद्गारली.

तिचा तो डौलदार पण चपल पदक्षेप आणि एका हातानें धुक्यासारख्या दिसणाऱ्या उर्दा रंगाच्या साडीचा घोळ आवरीत चालण्याची लगबग पाहून त्या म्हाताऱ्या चौकीदाराच्या मनांत आलें—

" या कांचनबाईचं तारुण्य कधींच नाहींसं होणार नाहीं का ?—"

सोळा वर्षांपूर्वी त्यानें जेव्हां तिला प्रथम त्या डाकबंगल्यांत पाहिली, तेव्हां खाणमालकाच्या थोरल्या मुलाच्या—रतिलालच्या—मोटारींतून खालीं उतरतांना तिच्या गतींत जी चपलता, जो चारुचंचल विभ्रम त्याच्या सराईत नजरेला दिपवीत प्रकट झाला होता, तोच विभ्रम, गतींतली तीच चारुता आणि चंचलता आज पस्तिशीच्या घरांत आल्यावरहि तिच्या गतींत दिसावी !—त्या म्हाताऱ्या चौकीदाराला राहून राहून आश्चर्य वाटे.

आणि मग तो रात्रीं हुक्का भरून त्याचा झुरका घेतांना खानसाम्याला म्हणावयाचा—

" सलाम, अरे आपली ही छोटी बाई कधीं बुढ्ढी व्हायचीच नाहीं का ?—"

" ठाकूर, तूं जोंवर तिला 'छोटी' म्हणतोस, तोंवर ती बुढ्ढी होणार कशी ? तुझ्यासारख्या कदीम ब्राम्हणाचा शब्द खुदा कसा खोटा पडूं देईल ?—"

" दिल्लगीची बात सोडून दे. पण, हें बघ, छोट्या मालकांना मरून आतां सात आठ वर्षं झालीं; न् हिचा छोकरा जयंतहि चौदा पंधरा वर्षांचा असेल आतां. मागल्या खेपेस तो बरोबर आला होता हिच्या, तर मला तो धाकटा भाऊच वाटला तिचा. ही मुंबईला रहाते नेहमीं. जवानी टिकवणारी कांहीं जडीबुटी तर घेतली नाहीं ना हिनं ?—"

" अरे, पण आपल्याला काय करायचंय तिच्या जवानीशीं ? तिची जवानी बघायला नजर सुद्धां साफ नाहीं ठेवली खुदानं आपली—"

" काय बोलतोस तूं हें सलाम ? अरे, ती बेटीसारखी आपल्याला. मला आठवतं, सोळा वर्षांपूर्वी याच दिवसांत दिवाळीनंतर छोट्या मालकांनीं आणली होती तिला इथं—"

" हं ! अन् तो पलिकडल्या कमऱ्यांत रात्रभर चाललेला गोंधळ ! मला वाटलं, ही जीवबीव देते की काय संतापाच्या भरांत—"

" काय नवाड्यासारख्या गोष्टी करतो आहेस, सलाम ! अरे, या डाकबंगल्यांतले असले प्रकार पहातांना न् मेहमानांचा रात्रीचा इंतजाम करतांना काळयाचे पांढरे झाले आहेत तुझे—"

" हो रे ! पण ही किती झालं तरी खानदान, शिकली सवरलेली छोकरी. पण आपले छोटे मालक फार हिमतीचे. त्यांनीं गफलतीनं तिला इथं आणली. तिनं इतका थयथयाट केला, पण त्यांनीं कांहीं चालूं दिलं नाहीं तिचं—"

" तें खरं. पण त्यांत गफलत त्यांचीच झाली अखेर. मुंबईहून ते दिवाळीसाठीं इकडे आले, म्हणजे दर खेपेला नवी मैत्रीण घेऊन यायचे

या डाकबंगल्यावर आणि दोन तीन रात्रीं इथं रंग उडवल्यावर पुन्हा कांहीं दृष्टीस पडत नसे ती त्यांची मैत्रीण आपल्या. पण हिनं त्या रात्रीच्या त्यांच्या जबरदस्तीचा पुरेपूर बदला घेतला अगदीं. लग्न करायला लावलं त्यांना आपल्याशीं; न् इस्टेटींतहि भाग तोडून घेतला स्वतःला—"

" कोणीहि झालं, तरी आपल्या तकदिरानं भोगतो, ठाकूर ! नाहीं तर बड्या मालकांसारखा कर्दनकाळ मऊ कसा आला असता या छोकरी-पुढं ! निराळी इस्टेट, निराळा बंगला—सगळं कांहीं अलग करून दिलं आहे हिला त्यांनीं !"

"अरे, गत्यंतरच नव्हतं, सलाम ! नाहीं तर कोर्टांत गेली असती ती न् बड्या मालकांच्या अब्रूचे धिंडवडे निघाले असते—"

"माझा विश्वास नाहीं बसत ठाकूर त्या गोष्टीवर. प्रत्यक्ष स्वतःच्या मुलाच्या बायकोवर—"

" उगाच काळ्याचे पांढरे केलेस या डाकबंगल्यांत राहून, सलाम ! या बड्या श्रीमान् लोकांना स्वतःच्या चैनीशिवाय दुनिया नाहीं दुसरी. आपल्या सुखविलासासाठीं ते कुणाचाहि न् कशाचाहि बळी देतील—"

" पण छोटी बाई वस्ताद भेटली त्यांना—"

" आणि ती इतकी अश्राप आहे म्हणूनच इतकी सुंदर दिसते अजून, सलाम—"

कांचनचा मुक्काम त्या डाकबंगल्यावर असला, म्हणजे रात्रीं हुक्का ओढतांना एकदां तरी त्या दोघांत तिच्याबद्दल अशा प्रकारच्या गप्पा होत असत.

तिथें आल्यावर तिनें क्षणभरहि विश्रांति घेतली नाहीं.

सलामनें पुढें आणून ठेवलेल्या चहाचे तिनें घाईघाईनें दोन तीन घोट घेतले आणि लगेच जलवेष चढवून ती बगीचांत आली.

आपल्याला हवें असलेलें कांहीं सामान बंगल्यावरून आणण्यासाठीं तिनें शोफरला सांगितलें आणि हातांतला मोठा थोरला पांढरा सफेत टुवाल अंगाभोंवती लपेटून तिनें रामसागराकडे जाणाऱ्या उंच निमुळत्या पायऱ्या उतरावयाला प्रारंभ केला.

तिला फार पायऱ्या उतराव्या लागल्या नाहींत. पावसाळा नुकताच संपलेला असल्यामुळें तलाव तुडुम्ब भरलेला होता; व टेंकडीला येऊन थडकणाऱ्या त्याच्या फेंसाळ लाटांत पायऱ्या बहुतेक बुडून गेलेल्या होत्या.

टेंकडीच्या उतारावरील दाट झाडींतल्या तीस पस्तीस नागमोडी पायऱ्या उतरून ती खालीं जाते न जाते, तोंच रामसागराचा अथांग विस्तार तिला आपल्यापुढें पसरलेला दिसला.

आपल्या अंगावरचा टुवाल तिनें एका झाडाच्या फांदीवर टाकला आणि पायऱ्यांवर येऊन आदळणाऱ्या फेंसाळ लाटांत हळूच पाय बुडवले.

त्याबरोबर तिच्या अंगावर एकदम शिरशिरी आली.

क्षितिजावर उंच चढलेल्या सूर्याचें ऊन पाण्याच्या सपाटीवर तळपत होतें. पण टेंकडीला कुरवाळणाऱ्या त्या लहान लहान लाटा !— त्या मात्र गार गार होत्या अगदीं अंगुलींच्या अग्रांप्रमाणें.

पण, आपल्यापुढें दूरच दूर पसरलेल्या त्या निळ्या चकचकीत पाण्यांत शिरण्याचा, त्याच्या लाटांशीं खेळण्याचा आणि त्याच्या गाढतेंत

डुबी देऊन अथांगाशीं समरस होण्याचा मोह तिला अनावर झाला होता. म्हणून ती वेगानें पाण्यांत शिरली.

आणि, लगेच तिला जाणवलें कीं, टेंकडीच्या अंगाला बिलगणाऱ्या लाटांचें पाणी जरी थंड असलें, तरी हें पाणी कांहीं थंड नाहीं. तें थंडहि नाहीं, उष्णहि नाहीं. फक्त सुखकर आहे.

त्याबरोबर तिच्या मनांत आलें कीं, आपल्या अंगावरला हा जल-वेष काढून फेंकून देऊन या रामसागराच्या गाढतेंत विलीन होऊन जावें, शरीराला क्षणोक्षणीं रोमांचित करणारी त्याची रम्यता सर्वांगानें भोगावी—

पण, न जाणों, कोणी कदाचित् आलें तर ?—

आणि, तो विचार जितक्या वेगानें तिच्या मनांत आला, तितक्याच वेगानें विरूनहि गेला.

ती किती वेळ तरी पाण्यांत स्वच्छंदानें डुंबत होती.

त्या पाण्याच्या तरंगातरंगांतून उठणारा नाद आणि चमकणारी द्युति—तिचे कान आणि डोळे तें निःशब्द संगीत आणि निःस्पर्श तेज यांच्या मोहनीनें जणुं वेडावून गेलें होतें; व पाण्याच्या उत्संखळ स्पर्शानें जो एक उन्माद माणसाच्या अंगांत संचरतो, त्यानें धुंद होऊन त्या हेलावणाऱ्या पाण्याच्या हिंदोळ्यावर, ती, एकाद्या मत्स्य-कन्येप्रमाणें, स्वैर आंदोलत होती.

मत्स्यकन्या ? हो, मत्स्यकन्याच.

उन्हांत तकतकणारा तिचा तो नागाच्या फणेसारखा केशबंध, ज्यांच्या काळ्याभोर पापण्यांवरून पाणी ठिबकत होतें असे ते मीना-कृति टपोरे डोळे, सुगौर तन्वंगाला घट्ट लपेटून बसलेला तो सुनील जलवेष, मत्स्याच्या पंखांसारखे पाणी तोडण्यासाठीं मधून मधून वर

येणारे हातांचे नाजूक लाल लाल पंजे आणि ज्याचा फक्त मधला भाग तेवढा पाण्यांत बुडालेला होता असें तें बाकदार, धनुष्याकृति शरीर !— ज्या लीलेनें ती पाण्यांतून संचार करित होती, त्या लीलेंत मोहकता आणि चपलता यांपैकीं अधिक काय आहे, याबद्दल खरोखरी एकाद्या मत्स्यकन्येलाहि संभ्रम पडून मत्सर वाटला असता.

ती कदाचित् पाण्यांतून लवकर बाहेर आली नसती.

पण तिच्या कानांवर एकदम पायरव आला.

एकदां तिला वाटलें, आपल्याला बराच वेळ झाल्यामुळें शोफर किंवा चौकीदार तर आपला शोध घ्यावयाला आले नसतील ?—

पण, आपण पोहत असतांना, ते एकदम समोर येणार नाहींत, प्रथम आडून कानोसा घेतील किंवा आवाज देतील, याची तिला खात्री होती.

म्हणून, पायरव कानांवर येतांच आणि त्याबरोबरच पाण्यांत कांहींतरी धप्पादिशीं पडल्याचा आवाज होतांच तिनें एकदम सळ्ळकन् गिरकी घेऊन पायऱ्यांच्या बाजूला पाहिलें.

त्याबरोबर तिच्या दृष्टीस पडलें—

जलवेष घातलेला कोणी रुबाबदार तरुण दोन्ही हात छातीवर ठेवून आपल्याकडे विस्मयानें आणि कौतुकानें पहात आहे आणि त्यानें पाण्यांत फेंकलेला पांढराशुभ्र केसाळ कुत्रा झपाट्यानें पोहत आपल्याकडे येत आहे.

आपल्या एकान्त जलक्रीडेंत आलेला तो व्यत्यय कांचनला सहन झाला नाहीं आणि ती पाणी तोडीत वेगानें पायऱ्यांकडे आली.

त्याच्यासमोर पाण्यांतून वर येण्याची तिची इच्छा नव्हती.

पण त्या पायऱ्यांशिवाय पाण्याबाहेर पडावयाला अवळपास दुसरा मार्गच नव्हता.

आणि तो तरुण तर त्या पायऱ्यांवर निश्चल उभा राहून तिच्या पाण्यांतल्या त्या सावेग हालचाली अनिमिष नेत्रांनीं पहात होता.

तिच्या अंगाची संतापानें अगदीं लाही लाही झाली.

आणि, जें पाणी क्षणभरापूर्वी तिला खेळकर आणि सुखकर वाटत होतें, त्या पाण्याचा स्पर्श तिला आतां दुःसह वाटूं लागला. तें खट्याळ पाणी एका अनोळखी इसमाच्या लालस नजरेसमोर आपल्याला फजीत करित आहे, असें तिच्या मनांत आलें---

तो शोफर, तो चौकीदार आणि तो खानसामा सारे गेले तरी कुठें ? हा परका इसम जलवेष घालून खालीं येईपर्यंत त्यांनीं मला वर्दी कशी दिली नाहीं ? या साऱ्या नोकरांनीं आज नशा केली कीं काय ?—

त्या संतापाच्या भरांतच ती तावातावानें पाणी तोडीत पायऱ्यां-जवळ आली आणि पाण्यांतून बाहेर पडली.

त्याबरोबर तिला वाट देण्यासाठीं तो तरुण चटकन् बाजूला झाला आणि स्मितपूर्वक हात जोडून त्यानें म्हटलें—

" नमस्ते—"

त्याचा तो नमस्कार स्वीकारण्याच्या मनःस्थितींत ती नव्हती. पण, सभ्यतेच्या अंगांत मुरलेल्या संस्कारांचा वरचष्मा होऊन तिच्या तोंडून न कळत उद्‌गार निघाला—

" नमस्ते—"

आणि त्याच्याकडे पुन्हा न पहातां त्या नागमोडी पायऱ्यांवरून ती झपाट्यानें उड्या मारीत झाडींत अदृश्य झाली.

## ३

कांचन आपल्या खोलींत आल्यावर तिच्या ध्यानांत आलें कीं, आपण टुवाल झाडाच्या फांदीवर विसरून आलों.

म्हणून तिनें जो दुसरा छोटा टुवाल ड्रेसिंग टेबलवर पडला होता, त्यानें आपलें अंग पुसावयाला सुरवात केली.

तोंच चौकीदार दारावर हलक्या हातानें थाप मारून म्हणाला—

“ बाईजी, आपला टुवाल साहेबांनीं पाठवला आहे—”

“ साहेब ? हे कोणते साहेब आणले आहेस आज तूं, ठाकूर!—” तिनें आंतूनच रागानें पण कुतूहलानें विचारलें.

“ हे साहेब मुंबईचे आहेत—”

“ केव्हां आले ?—”

“ आपण खालीं रामसागरावर गेलांत न् तितक्यांतच आले ते !—”

“ मग मला तसं लगेच कळवायचं काम नव्हतं तुझं !—”

“ हो. पण आपण पोहत असतांना आम्ही नोकरमाणसांनीं कसं यायचं तिथं, बाईजी ?—”

तो अजीजीनें म्हणाला.

त्याच्या त्या उद्गारांतली काकुळत तिला जाणवली आणि ती म्हणाली—

" अरे, पण तुझे ते साहेब पोहण्यासाठीं खालीं यायला निघाले, तेव्हां तर तूं वर्दी द्यायची होतीस कीं नाहीं मला ?—"

" कशी द्यायची बाईजी ! आम्हाला काय कल्पना ते लगेच्च आल्याबरोबर पोहायला जातील म्हणून ? ते खालीं गेल्यावर लक्षांत आलं आमच्या. पण मग वर्दी देऊन तरी काय उपयोग होता ?—"

" आणि शोफर आला नाहीं का अजून परत ?—"

" नाहीं जी—"

कांचनच्या मनांत आलें, तो मोटार घेऊन बंगल्यावर गेल्याला आतां चांगला दीड तास होत आला आणि अजून का परत आला नाहीं ? सामान तर कांहीं विशेष आणावयाला सांगितलें नव्हतें आपण——

तिचे आतां कपडे बदलून झाले होते. म्हणून तिनें खोलीचें दार उघडलें. त्याबरोबर व्हरांड्यांत लीनतेनें उभा असलेला चौकीदार तिच्या दृष्टीस पडला.

ती त्याला कांहीं म्हणणार, तोंच तो हात जोडून उद्गारला—

"कसूर माफ करा, बाईजी—"

त्या म्हाताऱ्यानें केलेल्या खुलाशानें तिचा राग बहुतेक मावळलाच होता. म्हणून त्याचा तो नम्रतेचा उद्गार ऐकून ती त्याला म्हणाली—

" तुझी कांहींच कसूर नाहीं, ठाकूर यांत. पण, मी पोहत असतांना तिऱ्हाईत माणूस खालीं आल्यामुळं केवढी पंचाईत झाली माझी—"

" कल्पना आहे मला. बाईजी कधींहि कुणासमोर पोहत नाहींत हें माहित आहे आम्हाला—"

" पण का रे, पूर्वी कधीं आले होते का हे साहेब इथं ?—"

" हो. गेलीं तीन वर्षं बहुतेक याच दिवसांत येतात ते इथं—"

" पण मी तर कधीं ऐकलं नाहीं तुझ्याकडून ?—"

" आपण कुठून ऐकणार ? इथं दुसरा कोणी मेहमान उतरलेला असला, तर क्षणभरहि थांबत नाहीं इथं आपण. मग आपल्याला कसं कळणार इथं कोण लोक येतात न् कोण नाहीं हें ! पण हे साहेब मोठे दिलदार न् संभावित आहेत बाईजी—"

" असं ?—"

" हो. नेहमीं येणाऱ्या इतर बड्या मेहमानांप्रमाणें भलभलते शोक नाहींत त्यांना. इथं आले म्हणजे आपल्या कुत्र्याला बरोबर घेऊन पोहतात, दोन्ही टेकड्यांवर खूप हिंडतात, नाहीं तर व्हरांड्यांत बसून सारखे वाचतात. मोठे दिलदार न् संभावित—"

त्या अनोळखी तरुणाविषयीं आपण अधिक जिज्ञासा दाखविणें अयोग्य दिसेल, हें चौकीदार बोलत असतांनाच तिच्या मनांत आलें; व त्याचें बोलणें तोडून टाकण्यासाठीं ती मध्येंच म्हणाली—

" हें बघ, मोटार आल्याबरोबर सांग मला. मी लगेच निघणार आहे—"

हे शब्द ती उच्चारीत आहे, तोंच मोटार कमानीखालीं येऊन उभी राहिली.

तेव्हां तिनें रागानेंच मनगटावरल्या सोन्याच्या बदामाकृति घड्याळाकडे पहात शोफरला विचारलें—

" एवढा उशीर का झाला रे ?—"

" बेबीनं इथं यायचा हट्ट धरला. तेव्हां तिला थोडी हिंडवून आलों मी इथं—"

" मग तिला इथंच का नाहीं घेऊन आलास ?—"

" आपला हुकूम नव्हता तसा—"

" मला काय स्वप्न पडलं होतं का ती इथं यायचा हट्ट धरील म्हणून ? आपण निघालों, त्या वेळीं निजलेलीच तर होती ती—"

कांचन हें बोलत असतांनाच तिच्या मनांत आलें कीं, या डाकबंगल्यावर रहावयाला येतांना मुलांना आपल्याबरोबर आणावयाचें नाहीं, हा आपला नेम शोफरला माहित असल्यामुळेंच त्यानें बेबीला आणलें नाहीं. त्यानं तिला इथं आणावयाला हवं होतं असें जें आज आपल्याला वाटलें, तें आपण इथून आतां निघून जाण्याचें ठरविलें असल्यामुळें—

आणि ती शोफरला म्हणाली—

" तूं खोलींतलं सामान भर सगळं मोटारींत. आपल्याला परत जायचंय लगेच—"

शोफर कांहीं बोलला नाहीं. त्यानें एकवार तिच्याकडे आणि एकवार चौकीदाराकडे मुकाट्यानें पाहिलें.

त्याची आणि चौकीदाराची काय नेत्रपल्लवी झाली कोण जाणे. ते दोघे लगेच खोलींत जाऊन सामान आवरावयाला लागले.

कांचन व्हरांड्यांत येऊन उभी राहिली.

त्याबरोबर बंगल्याच्या दुसऱ्या टोकाला असलेल्या खोलींत तो तरुण जी इंग्रजी प्रणयगीताची शीळ घालीत होता, ती तिच्या कानांवर आली आणि तिचा शमलेला राग पुन्हा उसळला—

" ते साहेब मोठे दिलदार न् संभावित आहेत, बाईजी—"

चौकीदाराचे ते शब्द तिला आठवले आणि तिच्या मनांत आलें, तो तरुण जर खरोखरीच संभावित असता, तर एक अनोळखी स्त्री पोहत आहे असें दृष्टीस पडतांच, तो क्षणभरहि पायऱ्यांवर न थांबतां, परत फिरला नसता का ? आपल्याला कोणी पहात नाहीं अशा खात्रीनें पोहत असलेल्या स्त्रीकडे जो टक लावून पहात उभा राहतो, तो इसम संभावित कसला ? चपराशांना काय, जातांना जो भक्कम चिरीमिरी हातावर ठेवील आणि शिवीगाळ न करतां माणुसकीनें वागवील, तो प्रत्येक मनुष्य दिलदार न् संभावित—

हे विचार तिच्या मनांत येत आहेत, तोंच शोफर समोर येऊन म्हणाला—

" सामान भरलं सगळं—"

" ठीक. निघायचं लगेच—"

ती आंत गेली आणि टेबलावर पडलेली आपली सुसरीच्या कातड्याची सुंदर मनिबॅग घेऊन बाहेर आली.

शोफरनें झटकन् पुढें येऊन मोटारचें दार उघडलें.

आणि, ती आतां पायऱ्या उतरून आंत बसणार, तोंच तो तरुण एकदम पुढें येऊन इंग्रजींत म्हणाला—

" माफ करा हं ! पण, मला वाटतं, मी इथं आल्यामुळं आपण आपला कार्यक्रम रद्द करून परत जातां आहांत. म्हणून मी मुद्दाम विनंती करायला आलोंय आपल्याला—"

ती कांहीं बोलली नाहीं. मोटारीच्या उघडलेल्या दारावर हात ठेवून ती त्याचें बोलणें मुकाट्यानें ऐकत होती.

आपला तो पांढरा केसाळ कुत्रा त्यानें कुशींत धरला होता. त्याचे केरवा मण्यासारखे पिंगट डोळे तिच्यावर रोखलेले होते आणि त्याच्या हाताच्या कवेंतून सुटून तिच्या अंगावर झेंप टाकण्यासाठीं तो धडपडत होता.

" जिम्, चूप !—"

त्यानें मध्येंच म्हटलें आणि त्या कुत्र्याच्या टाळूवर जिथें काळा ठिपका होता, तिथें दोन बोटांनीं टप्पू दिला.

त्याबरोबर कुत्र्याची धडपड थांबली आणि तो तिला म्हणाला—

" माझ्यामुळं आपला विरस होऊन आपण अशा रीतीनं इथून निघून जाण्यापेक्षां मीच गेलेलं काय वाईट ? म्हणून मी आतांच चौकी-दाराला पाठवलं आहे व्यवस्था करायला मोटारची. तेव्हां आपल्याला आतां जायचं कारण नाहीं मुळींच—"

त्याच्या आवाजांतली मिठ्ठास आणि शब्दांतलें आर्जव यांपैकीं अधिक आकर्षक काय आहे, हें तिला समजेना.

शोफर बाजूला उभा राहून त्या दोघांकडे कुतूहलानें पहात होता.

ती अगदीं स्तब्ध उभी होती.

आपण आपला कार्यक्रम तुझ्यासाठीं रद्द करित नाहीं, असें त्या तरुणाला सांगून टाकावें, असें एकवार तिच्या मनांत आलें. पण क्षणार्धच. लगेच तिला वाटलें कीं, तसें सांगणें योग्य दिसणार नाहीं. आणि ती म्हणाली—

" आपण परप्रान्तांतून इथें आलेले आहांत. तेव्हां आपणच थांबा. मी पुन्हा केव्हांहि येऊं शकेन इथं—"

" तें खरं. पण आज तर माझ्यामुळं आपल्याला जावं लागतंय ना ? मला वाटतं, आपल्यापैकीं कोणालाच खरोखरी जाण्याची गरज नाहीं. मी आपल्याला आश्वासन देतों, आपण बंगल्याच्या ज्या भागांत रहात आहांत, त्या भागाकडे मी फिरकणार सुद्धां नाहीं. पण माझ्या-मुळं आपल्या कार्यक्रमाचा विरस होऊं नये, अशी फार इच्छा आहे माझी—"

" पण माझा कार्यक्रम असा मुळीं कांहीं नव्हताच—"

त्याच्या त्या आग्रही बोलण्याला कांहींतरी उत्तर द्यावयाचें म्हणून ती म्हणाली.

" नसेलही कदाचित्. पण, असल्या रम्य एकान्त ठिकाणीं दिवसभर येऊन नुसतं रहाणं हा सुद्धां एक कार्यक्रम नाहीं का होऊं शकत ? आपल्या रोजच्या व्यवसायांतून न् विवंचनांतून शरीर न् मन बाहेर काढून जिथं त्यांची आठवणहि होऊं नये. अशा एखाद्या दूर-

निवांत, निसर्गसुंदर ठिकाणीं जाऊन एकाद् दुसरा दिवस घालवणं हा, मला वाटतं, सगळयांत आनंददायक कार्यक्रम आहे—"

ती कांहीं बोलली नाहीं.

" मला खरोखरच वाटतं आपण जाऊं नये असं. आणि, इतक्याहि उपर आपण गेलांत, तर मग मीहि रहाणार नाहीं इथं. मी अचानक इथं आल्यामुळं दुसऱ्या कुणाला तरी इथून निघून जावं लागलं, ही गोष्ट सारखी खात राहील माझ्या मनाला. दुसऱ्याच्या सुखांत बिघाड आणून मिळणारं कोणतंहि सुख गोड वाटलेलं नाहीं मला कधीं—"

तरीहि कांचन कांहीं बोलली नाहीं.

पण, इतका वेळ गप्प उभ्या असलेल्या शोफरनें का कोण जाणें, तिच्या समोरच मोटारींत ठेवलेले तिचे कपडे वगैरे सामान काढावयाला सुरवात केली.

तेव्हां तो तरुण मुकाट्यानें शीळ घालीत परत फिरला आणि ती अस्वस्थ मनानें आपल्या खोलींत आली.

आपण अशा रीतीनें आपला परत जाण्याचा बेत रद्द केला, ही गोष्ट चांगली की वाईट ? आजपर्यंत कधींहि अशा तऱ्हेनें आपण आपला बेत बदललेला नाहीं. लोक आपल्याविषयीं नुसत्या संशयानें वाटेल तें बोलत असतील. आणि आपल्याबरोबर पुष्कळ वेळां आपले पुरुष स्नेही, तरुण चिटणीस किंवा समाजकार्यांतील सहकारी रहात असल्या-मुळें लोकांना तसा संशय घ्यावयाला जागाहि पण मिळते. तथापि, आपल्या भोंवतालच्या नोकराचाकरांना, आपल्या पाळतीवर असलेल्या त्या काकदृष्टि सासऱ्याला किंवा इथें आल्यावर मालकाच्या चिथावणीनें

आपल्याला नाना परीनें अप्रत्यक्ष उपद्रव देणाऱ्या त्या लाल अस्वलाला—त्या अँग्लोइंडियन व्यवस्थापकाला—कोणालाहि एक शब्द बोलावयाला जागा मिळेल, असें वर्तन कधीं होऊं दिलेलें नाहीं आपण आपल्या हातून. आपल्या जवळ राहणाऱ्या किंवा पाळतीवर असणाऱ्या माणसांच्या दृष्टीनें धुतल्या तांदळासारखें आहे आपलें चारित्र्य आणि त्यामुळेंच त्या दुर्बुद्धि सासऱ्यापासून तों त्या लाल अस्वलापर्यंत सगळ्यांना आपला वचक वाटतो. अशा स्थितींत आपलें हें आजचें वर्तन—तो तरुण इथं असतांना जर आपण आज इथं राहिलों, तर लोक काय म्हणतील ? शोफरच्या, चौकीदाराच्या, खानसाम्याच्या मनांत तरी काय येईल ? छे, तो तरुण इथें असतांना आपण इथें राहणें चुकीचें, आत्मघातकीपणाचें आहे. नवरा वारल्यापासून गेलीं सात आठ वर्षें आपण ज्या दराऱ्यानें आणि रुबाबानें वागलों, त्यावर पाणी पडेल आजच्या या आपल्या हातून भिडेखातर घडत असलेल्या चुकीमुळें—

पण, इथल्या चाकरमाणसांनीं, शोफरनें न् चौकीदारानें, खरा प्रकार पाहिलेला आहे. लोकांनीं कांहींहि कुतर्क लढवले, त्या लाल अस्वलानें मुंबईला कशाहि प्रकारचें विषारी पत्र लिहिलें, तरी हीं माणसें साक्ष आहेत खऱ्या प्रकाराला. त्यांच्यापेक्षांहि आपलें मन, ज्याला तलवारीच्या नाजूक पण तीक्ष्ण पात्याची उपमा आपला नवरा नेहमीं देत असे तें आपलें मन—तें ग्वाही आहे या सगळया प्रकाराला. छे, आपल्याला कोणालाहि भिण्याचें न् इथून निघून जाण्याचें कारण नाहीं मुळींच—

आणि, आपण जात नाहीं अशा कल्पनेनें निभ्रांत मनानें परत गेलेल्या त्या तरुणाला, आतां जर पुन्हा आपण जावयाला निघालों,

तर काय वाटेल ? " दिलदार न् संभावित,—" चौकीदार म्हणाला तें खरें आहे अगदीं.—" आपण बंगल्याच्या ज्या भागांत रहात आहांत, त्या भागाकडे मी फिरकणार सुद्धां नाहीं—" हें त्याचें आश्वासन आणि त्याहिपेक्षां, " दुसऱ्याच्या सुखांत बिघाड आणून मिळणारं सुख गोड वाटलेलं नाहीं मला कधीं " हा त्याचा उद्गार ! छे, इतक्या दिलदार न् संभावित माणसाचा शब्द डावलून जाणें शोभणार नाहीं आपल्याला—

पण, इथें एकदां रहावयाचें ठरवल्यानंतर तो त्या टोकाला आणि आपण या टोकाला, त्यानें इकडे फिरकावयाचें नाहीं आणि आपण तिकडे फिरकावयाचें नाहीं, हें तरी बरें दिसेल का ?

" बाईजी, आपण चहा घेणार का ? पोहून परत आल्यावर आपण, नेहमीं कांहीं तरी गरम पेय घेतां न् फराळहि करतां. मघांचच्या गड-बडींत मी विचारायला विसरलों. आतां चहा आणायला सांगू का सलामला ? ठेकेदारानं काबुली अंगुर न् पेवबंदी बोरं आणलीं आहेत आतांच—"

ती आपल्या विचारांत गर्क असतां चौकीदारानं मध्येंच खोलींत येऊन विचारलें.

" पण का रे, तूं मोटार पाह्यला गेला होतास ना त्या साहे-बांसाठीं, ठाकूर ?—"

" हो. त्यांनीं मला सांगितलं न् लगेच मी निघालोंहि. पण, मग पाह्यलं, आपला परत जायचा बेत रद्द झाला—"

कांचननें आपली तीक्ष्ण दृष्टि त्या बुढ्ढ्याच्या सुरकुतलेल्या चेहऱ्यावर टाकली. पण, त्याच्या खोल, कातळी मनांत काय घोळत आहे, याचा कांहींच थांग तिला त्याच्या मुद्रेवरून लागेना.

" मग चहा घेणार आपण ?—"

" त्यांनीं घेतला का चहा ?—"

" नाहीं. आतांच त्यांनीं चहाचा हुकूम दिला आपण परत जायचा बेत रद्द केल्याची खात्री झाल्यावर. तेव्हां सलाम मला म्हणाला, बाईजीनींहि आज चहा घेतलेला नाहीं नेहमीप्रमाणं पोहून आल्यावर. म्हणून मुद्दाम आलों मी विनंती करायला—"

" बरं, मग असं कर.—व्हरांड्यांतच चहाची व्यवस्था करा सगळी. आह्मीं दोघं एकत्रच चहा घेऊं. मी चिठी देतें, ती त्यांना दे. आणि, हें पहा, ठेकेदारानं जीं फळं आणलीं असतील, त्यांतली कांहीं चहाबरोबर द्यायला सांग सलामला—"

तिनें आपल्या ब्लाऊजला अडकवलेलं पेन काढलें आणि टेबलावरल्या पॅडवर घाईघाईनें तीन चार ओळी खरडून ती चिठी चौकीदाराजवळ दिली.

" या चिठीचं उत्तर बाहेर टेबलावर ठेवून दे न् पंधरा मिनिटांनीं चहा आणायला सांग सलामला—"

आणि ती लगेच उठून आंतल्या खोलींत गेली.

बरोबर पंधरा मिनिटांनीं सलामनें चहाचा ट्रे, टोस्ट आणि फळांनीं भरलेल्या बशा आणून त्या व्हरांड्यांतील वेताच्या चौकोनी टेबलावर व्यवस्थित मांडून ठेवल्या; व दोन खुर्च्या समोरासमोर मांडून दोन छोटे परीटघडी रुमाल त्यांच्या हातांवर ठेवून दिले.

तोंच तो तरुण आपल्या कुत्र्यासह तिथें आला. बंगाली पद्धतीचा किंचित् पिवळसर झांक असलेला घोळदार रेशमी सदरा त्यानें घातला होता; व धोतराच्या निऱ्यांचे सोगे पायांवर सोडून दिले होते. त्याची आंखूड, पुष्ट मान आणि रुंद, भरदार छाती यांना तो पोषाख शोभून दिसत होता.

पायऱ्या चढून वर आल्यावर त्यानें खानसाम्याकडे साभिप्राय पाहिलें. पण तो कांहीं बोलला नाहीं. त्यानें फक्त सलाम करून खोलीच्या दारावर लोंबत असलेल्या हिरव्या पडद्याकडे दृष्टिक्षेप केला.

तोंच त्या तरुणाच्या पाठोपाठ आलेला चौकीदार त्याला अदबीनें म्हणाला—

“ आपण बसा, साहेब. बाईजी येतीलच इतक्यांत—”

पण तो बसला नाहीं. ज्या इंग्रजी गाण्याची शीळ तो मघांशीं घालीत होता, त्याची शीळ त्यानें आतां पुन्हा घालावयाला सुरवात केली.

सलाम आणि ठाकूर दोघेहि दोन खुर्च्यांच्या मागें मुकाट्यानें उभे होते.

फक्त त्याचा कुत्रा मात्र टेबलावर ठेवलेल्या टोस्टच्या वासानें खूष होऊन आपल्या शेपटीचा पाठीवर मुरडलेला लहानसा गोंडा हलवीत मालकाच्या पायांभोंवती आणि टेबलाभोंवती घिरट्या घालीत होता.

तोंच खोलीच्या दारावरला पडदा बाजूला सारून कांचन बाहेर आली आणि दोन्ही हात जोडून तिनें म्हटलें—

“ नमस्ते—”

त्याबरोबर त्यानें चमकून मागें वळून पाहिलें.

ती प्रसन्न मुखानें त्याच्याकडे पहात होती. मोतिया रंगाची तलम साडी ती नेसली होती; व गळ्यांत किंचित् लाल झांक असलेल्या टपोऱ्या मोत्यांची एकावलि, हातांत एक एक मोत्यांचें कांकण आणि कानांत अर्ध्या कापलेल्या मोत्यांचीं मोठालीं कर्णकुंडलें एवढेच काय ते अलंकार तिच्या अंगावर होते.

त्याच्या मनांत आलें, त्या भूषणांच्या कांतींत आणि तिच्या प्रसन्न मुखावरील त्या अप्रकट स्मिताच्या छटेंत किती मनोज्ञ रंग-संगति आहे !

ही कल्पना त्याच्या मनांत येत आहे, तोंच ती इंग्रजींत म्हणाली—

“ मी आपली फार आभारी आहे चहाला आल्याबद्दल—”

“ नाहीं. मीच खरोखरी आपले आभार मानले पाहिजेत आपण आपला इथून जायचा बेत माझ्या शब्दाला मान देऊन रद्द केल्याबद्दल—”

“ मला वाटतं, आपण एकमेकांचे आभार मानण्यांत कांहीं स्वारस्य नाहीं फारसं—”

ती हंसून उद्गारली आणि आपली परिचयपत्रिका त्याच्या हातांत देत तिनें म्हटलें—

“ मी स्वतःच माझी ओळख करून देतें आपल्याला—”

त्याला नोकरांकडून तिची सर्व माहिती आगाऊच मिळालेली होती. पण तसें कांहीं न दाखवतां त्या परिचयपत्रिकेवर नजर टाकीत त्यानें म्हटलें—

“ मी आपलं नांव न् फोटो दोन्हींहि पाह्यलेलीं आहेत वर्तमान-पत्रांत. मुंबईतल्या समाजसेवेच्या सगळया कार्यांत—”

“ हो. आमच्यासारख्या रिकामटेकड्या संपन्न माणसांनीं स्वतःच्या जिवामागें मुद्दाम लावून घेतलेले व्याप आहेत हे. त्यामुळं समाजाचं कल्याण खरोखरी किती न् काय होत असेल, हा प्रश्नच आहे खरोखरी एक—”

तो जें आपल्याविषयीं स्तुतिपर बोलेल असें तिला वाटत होतें, तें टाळण्यासाठीं तिनें मध्येंच म्हटलें.

“ पण आपण आपला परिचय नाहीं करून दिला मला—”

“ माझा परिचय ?—”

त्यानें एकदम चमकून म्हटलें; व आपली परिचयपत्रिका खिशांतून काढून तिच्या हातीं देत तो म्हणाला—

“ मी एका युरोपियन फॉर्मसीचा प्रवासी प्रतिनिधि आहे—”

कांचननें त्या पत्रिकेवरलें नांव पाहिलें—

‘ धनंजय सबनीस, एम्. एस्सी.’

आणि ती नंतर त्याला म्हणाली—

" पण हें आमचं गांव म्हणजे कांहीं असला माल खपवायचं ठिकाण नव्हे. मग आपण कसे काय आलांत आज इथं ?—"

" तें खरं आहे आपलं म्हणणं. पण, या गांवाची न् इथल्या टेकडीवरल्या राममंदिराची साऱ्या हिंदुस्थानभर ख्याति आहे निसर्गसुंदर तीर्थक्षेत्र म्हणून. त्यामुळं तीन वर्षांपूर्वी प्रथम जेव्हां मी या बाजूला आलों, तेव्हां हें गांव न् मंदिर पाह्यलं आणि त्याच वेळीं एका माहितगारानं हा रामसागर न् डाकबंगला हीं दोन्हींहि मला दाखवलीं. तेव्हांपासून मी ठरवून टाकलं कीं, इकडल्या बाजूला आलों म्हणजे एक दिवस तरी या डाकबंगल्यावर राहून जायचं. आपण तर मालकच आहांत इथल्या—"

" मी ? छे, चुकीची आहे आपली कल्पना. माझं कांहींच नाहीं या गांवांत नदीकांठच्या एका बंगल्याशिवाय. मालक थोरले शेठजी आहेत—"

" थोरले शेठजी ? "

" होय. माझे सासरे—"

आणि तेवढे शब्द उच्चारतांच तिनें एकदम तें संभाषण तोडून टाकण्यासाठीं म्हटलें—

" मला वाटतं, चहा निऊन गेला असेल बहुतेक—"

आणि लगेच चहा ओतावयाला प्रारंभ केला.

त्याच्यापुढं चहाचा कप ठेवतांना ती म्हणाली—

" तुम्ही आपल्या या धंद्याच्या निमित्तानं सगळया हिंदुस्थानभर प्रवास केला असेल न् नाना प्रकारचीं माणसं पाह्यलीं असतील नाहीं ?–"

" हो. पण आज आपल्याला पाहून मला जें वाटलं, तें पूर्वी कुणालाहि पाहून वाटलं नव्हतं मला—"

" का बरं ? माझ्यांत असं काय आहे विशेष ?—"

तिनें आपल्या विरळ भुवया किंचित् उंचावून विचारलें.

त्याबरोबर तिच्या उंच, अकलंक कपाळावर उमटत गेलेल्या नाजूक रेषांकडे पहात त्यानें म्हटलें—

" मलां वाटतं आपल्यांत विशेष काय नाहीं असं उलट विचारावं लागेल मला आपल्याला—"

त्यानें कोणत्या भावनेनें तो उद्गार काढला, हें जाणण्याची तिला इच्छा होती. पण त्याला तसें कांहीं विचारणें तिला योग्य वाटेना. म्हणून थोड्या वेळानें ती त्याला म्हणाली—

" तुह्माला कसा काय आवडतो हा बंगला ?—"

" मला फार आवडतो; न् म्हणूनच तर मी या बाजूला आलों म्हणजे इथं येऊन एकादा दिवस तरी घालवतों. पण, आपण इथल्या रहाणाऱ्या असूनसुद्धां आपल्यालाहि हा बंगला इतका प्रिय असावा, हें नवल नाहीं का ?—"

" का बरं ? तुह्मांला ज्या कारणामुळं तो आवडतो, त्याच कारणामुळं मलाहि कदाचित् आवडत असेल तो—"

" मला नाहीं वाटत तसं. माफ करा हं जरा मोकळेपणानं मी बोलतोंय याबद्दल. मघांशीं मी आलों, तेव्हां तुम्ही ज्या खोलींत उतरला आहांत, तिथंच उतरायची माझीही इच्छा होती. पण चौकीदारानं ती खोली तुमच्याकडे असल्याचं मला सांगितलं; न् मी जेव्हां त्याला तिथं कोण उतरलंय असं विचारलं, तेव्हां तो म्हणाला—"

" काय म्हणाला तो ?—"

" तो म्हणाला, " बाईजी या खोलीशिवाय दुसरीकडे कुठं रहात नाहींत या बंगल्यांत." तेव्हां माझ्या मनांत एकदम आलं, तुमचं कांहीं जीवनरहस्य तर या खोलीशी संलग्न झालेलं नसेल ? तुमच्या आयुष्यांतली कोणती अविस्मरणीय घटना तर या खोलींत, या डाकबंगल्यांत घडलेली नसेल ?—"

त्याचा तो उद्गार ऐकतांच आपल्या हृदयाची निर्गाठ लाघवी, हळुवार हातांनीं उकलण्याचा प्रयत्न तो करित आहे, असें तिला वाटलें आणि त्याला प्रतिकार करण्यासाठींच जणुं ती एकदम म्हणाली—

" छे ! कांहीं तरीच कल्पना आहे तुमची ही ! या खोलींतून रामसागर न् पलिकडलं मैदान यांचा देखावा मोठा रम्य दिसतो, म्हणून आवडते ही खोली मला—"

" तुम्हीं म्हणतां तसं असेलहि. पण चौकीदारानं सांगितलं तेंहि खरं असावं—"

" नोकरांच्या जिभा नाहीं तरी नेहमींच सैल असतात. त्यांतून आपल्यासारखा संभावित, दिलदार श्रोता लाभला, म्हणजे त्यांच्या गप्पांना कोणता रंग चढेल याचा कांहीं नेम नाहीं—"

तो क्षणमात्र कांहीं बोलला नाहीं. गुडघ्यावर पंजे टेकून शेपटीचा गोंडा हलवीत आपल्याकडे आतुरतेनें पहात असलेल्या कुत्र्याला टोस्टचा एक मोठा तुकडा देऊन त्यानें स्वतःशींच बोलावं त्याप्रमाणें म्हटलें––

" जिम्, आतां त्रास देऊं नकोस मला पुन्हा—"

" तुम्हीं प्रवासांतसुद्धां बरोबर बाळगतां का हा कुत्रा ?—"

" हो. मला एकांत मुळींसुद्धां सहन होत नाहीं––"

" आणि मला तर तो अत्यंत प्रिय आहे––"

तिच्या तोंडून चटादिशीं उद्गार निघून गेला. पण, तो त्याच्या लक्षांत येऊं नये म्हणून ती कांहीं बोलणार, तोंच त्यानें म्हटलें—

" त्याचा अनुभव आला मघांशीं मला. पण, एकान्तप्रियता ही मनोविकृतीच नाहीं का एक प्रकारची ?—"

" ती कशी काय ?—"

" माणसाला ज्या वेळीं आपलं जीवन म्हणा किंवा मन म्हणा लोकांना समजूं नये अशी इच्छा होते, तेव्हां तो जनदृष्टीच्या भीतीनं एकान्ताचा आसरा करतो, असं नव्हे का ?—"

" हो. असं म्हणतां येईल. पण केव्हां केव्हां असंहि होत असावं कीं, आपलं मन समजण्याची न् त्याच्याशीं समरस होण्याची पात्रता भोंवतालच्या माणसांना नाहीं, असं वाटल्यामुळंहि मनुष्य एकान्तप्रिय होत असावा. दुसऱ्यांना जें समजण्याचा संभव नाहीं, तें त्यांना सांगण्यांत तरी काय स्वारस्य ?––"

" तुमची एकान्तप्रियता या प्रकारची आहे, असं म्हणायचं आहे का तुम्हांला ? पण तुम्ही कधीं तरी येऊं दिलंय का कुणाला आपल्याजवळ ? आणि मन मोकळं करून पाह्यलंय का कुणाशीं ?—"

" कांहीं गोष्टी अशा असतात कीं, त्यांच्या बाबतींत प्रयोग करणं धोक्याचं असतं—"

" पण केव्हां केव्हां धोका पत्करूनहि प्रयोग करावे लागतात, असं नाहीं वाटत तुम्हाला ? मघांशीं तुम्हीं एकाएकीं जायला निघालांत, त्या वेळीं मी जेव्हां तुम्हांला न जाण्याची विनंती करायला आलों, तेव्हां सारखं मला वाटत होतं कीं, तुम्हीं कदाचित् माझा अपमान करून निघून जाल. पण तो धोका मी पत्करला न् आतां आपण इथं गप्पा मारित बसलों आहोंत स्नेहभावानं—"

त्याच्या त्या बोलण्यावर काय उत्तर द्यावें, हें तिला सुचेना. तिनें चहाचा शेवटला घोट घेतला आणि ती म्हणाली—

" तुम्हीं माझ्यापेक्षां जग जास्त पाह्यलंय. तेव्हां तुमचं म्हणणं बरोबरहि असेल कदाचित्. पण स्त्रीची परिस्थिति कोणत्याहि बाबतींत जास्त नाजूक न् बिकट असतें हे विसरूं नका तुम्हीं—"

ती बोलतां बोलतां उठून उभी राहिली.

तिची या प्रश्नावर जास्त बोलण्याची इच्छा नाहीं, हें लगेच लक्षांत आलें त्याच्या; व तो उठून तिला म्हणाला—

" मग आतां जेवायच्या वेळीं भेट होईल आपली पुन्हा ?—"

" हो—"

तिच्या तोंडून न कळत रुकार निघून गेला.

“ चल जिम्, आतां फिरायला—”

त्यानें शीळ घालावयाला सुरवात केली. त्याबरोबर कुत्रा उड्या मारीत त्याच्यापुढें धांवूं लागला.

ती स्तब्ध उभी होती.

तो दृष्टीच्या टप्प्यापलिकडे गेल्यावर तिनें शोफरला हांक मारली आणि म्हटलें—

“ आपण दुपारीं जेवल्याबरोबर निघूं इथून परत जायला—”

## ४

कांचन आपल्या खोलींत गेली आणि ड्रेसिंग टेबलाच्या आरशा-समोर उभी राहिली.

त्या आरशासमोर उभें राहून तिनें आपलें अंग पुसल्याला आणि नंतर ती मोतिया रंगाची साडी नेसल्याला अद्याप पुरता तासहि झाला नव्हता. पण, आतां ज्या वेळीं आरशासमोर येऊन ती उभी राहिली, त्या वेळीं त्यांत पडलेलें आपलें प्रतिबिम्ब पाहून ती दचकली.—त्या प्रतिबिम्बानें सोळा वर्षांपूर्वीं त्या खोलींत घडलेल्या प्रसंगाचा चित्रपट

तिच्या डोळ्यांपुढें उभा केला आणि तिला वाटलें, सोळा वर्षांपूर्वी या डाकबंगल्यांत जेव्हां रतिलालबरोबर आपण प्रथम आलों होतों, त्या दिवशीं या आरशांत पडलेलें आपलें प्रतिबिम्ब आज आपण पुन्हा पहात आहोंत.

सोळा वर्षांपूर्वींची ती अल्लड, अश्राप कांचन आणि आजची ही मानी, अबोल गतधवा ! कौमार्यापासून वैधव्यापर्यंतचीं मधलीं तीं सोळा वर्षें, जणुं यौगिक सामर्थ्यानें, एकामागून एक विरून गेलीं आणि सोळा वर्षांपूर्वी याच आरशासमोर उभ्या असलेल्या त्या अव्याज-मुग्ध कुमारिकेचें प्रतिबिम्ब आपण आज पहात आहोंत, असा भास कांचनला झाला.

तीच ही खोली, तेच हे हिवाळ्याच्या प्रारंभींचे दिवस आणि तोच हा आरसा.—आपण फिरून परत आल्यावर केस नीटनेटके करित होतों आणि रतिलाल अचानक आपल्या मागें येऊन उभा राहिला—

" तुमचं कांहीं तरी जीवनरहस्य या खोलीशीं संलग्न झालेलं आहे–"

हे त्या तरुणाचे शब्द ! त्या शब्दांत अशी काय जादू, असें काय मांत्रिक सामर्थ्य होतें कीं, ज्याच्या प्रभावानें त्या जीवनरहस्याचा संपूर्ण चित्रपट तिच्या डोळ्यांपुढें उभा रहावा ?

पण स्वतःचें प्रतिबिंब दृष्टीला पडतांच तो चित्रपट तिच्या डोळ्यांपुढें उभा राहिला खरा—

तें स्वतःचें प्रतिबिंब, त्या प्रतिबिंबांतून एकाएकीं आविर्भूत झालेला आपल्या जीवनरहस्याचा तो चित्रपट तिला पाहवेना. म्हणून ती आरशा-समोरून बाजूला झाली आणि खिडकीपाशीं येऊन उभी राहिली.

रामसागराच्या लाटांवर लोळून येणाऱ्या वाऱ्याच्या गार झुळका तिच्या अंगाला बिलगल्या; बंगल्याच्या कडेनें त्या खिडकीच्या खालीं लावलेल्या निशिगंधाच्या सुवासाचा दरवळ त्या झुळकांबरोबर आंत येऊन तिच्या भोंवतीं पसरला आणि जो चित्रपट पाहण्याची इच्छा नसल्यामुळें ती आरशासमोरून बाजूला झाली होती, तो चित्रपट पुन्हा तिच्या डोळयांपुढें उभा राहिला—

होय. तींच हीं निशिगंधाचीं फुलें. आपण फिरून परत येत असतां त्यांचा झुबकाच्या झुबका रतिलालनें आपल्या वेणींत अलगत खोवून दिला होता. आपण आरशासमोर उभें राहिल्यावर आपल्या तें लक्षांत आलें आणि किती आनंद झाला आपल्या मनाला! तींच हीं निशिगंधाचीं फुलें—

आणि तो पलिकडला रामसागर ?—

मघांशी त्या तरुणाला आपण सांगितलें कीं, या खोलींतून रामसागराचा जो रम्य देखावा दिसतो, त्यामुळें ही खोली इतकी प्रिय आहे आपल्याला. तें कांहीं खोटें नव्हतें. सोळा वर्षांपूर्वी अशाच एका सायंकाळीं आपण रतिलालबरोबर रामसागरावर आलों, मनसोक्त हिंडलों आणि नंतर याच खिडकींत शेजारीं शेजारीं उभें राहून इथून दिसणारें त्याच्या जललहरींचें नृत्य पाहिलें—

तो आरसा, तीं निशिगंधाचीं फुलें आणि तो रामसागर—

छे, हे सगळेच आरसे आहेत. आणि या सगळ्या आरशांत सोळा वर्षांपूर्वी घडलेल्या त्या प्रसंगांतील निरनिराळ्या मधुक्षणांचीं—आणि कटु क्षणांचीं सुद्धां—स्मृतिबिम्बें पडलेलीं आहेत—

त्या एका आरशाकडे पाठ फिरवून काय उपयोग? त्या आरशांतलें स्वतःचें प्रतिबिम्ब पाह्यचें मी नाकारलें, तरी या रामसागरांतलें स्मृतिबिम्ब–तें डोळे मिटले, तरीहि नाचत राहील माझ्या मनःचक्षूंपुढें—

हे डोळे मिटतां येतील. पण ते डोळे?

त्या तरुणाच्या शब्दांनीं डिंवचून जाग्या केलेल्या स्मृति—त्या स्मृतींचीं पिशाचें त्या जीवनरहस्याचा चित्रपट जणुं हट्टानें नाचवीत आहेत आपल्या डोळयांपुढें—

तिची आणि रतिलालची पहिल्यांदा भेट झाली, तो प्रसंग तिच्या डोळयांपुढें उभा राहिला.

ती त्या वेळीं कॉन्व्हेंटमध्यें शिकत होती.

कॉन्व्हेंटमधील आपल्या एका पारशी वर्गभगिनीच्या घरीं तिनें प्रथम रतिलालला पाहिला. त्याचा आणि त्या मुलीच्या थोरल्या बहिणीचा फार स्नेह होता. त्या मुलीच्या तोंडून तिनें असें ऐकलें होतें कीं, सेंट झेवियर्स कॉलेजमध्यें तिची थोरली बहीण आणि रतिलाल हीं दोघें एका वर्गांत होती; व तेव्हांपासून त्यांचा जो स्नेह जमला, तो पुढें सारखा वाढतच गेला.

रतिलाल त्या वेळीं विधुर होता.

तो कॉलेजच्या पहिल्या वर्षांत असतांनाच त्याची बालवधू वारली होती. कॉलेजांत गेल्यावर तो मुंबईतल्या कलाभिवृद्धि करण्यासाठीं स्थापन झालेल्या निरनिराळया संस्थांचा आश्रयदाता बनला; व त्यामुळें नृत्यसंगीताचा नाद असलेल्या नव्या नव्या तरुण मुलींशीं

त्याचा सारखा संबंध येऊं लागला. त्याच्या या शोकीनपणाचें शेठजींना प्रथम कांहीं वाटलें नाहीं. पण, त्यांना न विचारतां मुंबईतल्या एका नवीन निघालेल्या सिनेमा कंपनीचा जेव्हां तो डायरेक्टर झाला, तेव्हां मात्र शेठजींनीं एक दिवस त्याला आपल्या खोलींत बोलावून म्हटलें—

" तुझ्या ललित कलांच्या छंदाबद्दल आजवर तुला मी कधीं कांहीं बोललों नाहीं. पण, हा जो तुझा नवा नाद आहे, तो मात्र मला मुळींच मंजूर नाहीं, रतिलाल ! या नादापायीं लाखों रुपयांचा चुराडा होईल--"

" लाखों रुपये कोणत्या नादापायीं उडत नाहींत, पिताजी ? त्याच्यासाठीं कांहीं सिनेमानटींच्याच नादीं लागायला नको. आपण स्वतः दर चार दिवसांनीं मुंबईहून गोव्याला जाण्यासाठीं स्वतंत्र बोट ठरवली आहे हें काय माहित नाहीं आम्हांला ?—"

रतिलालनें दिलेला तो टोमणा बड्या शेठजींना अगदीं मर्मीं लागला. त्यांची आवडती गायिका क्षयाची भावना झाल्याची शंका आल्यामुळें गोव्याला समुद्रकांठीं जाऊन राहिली होती. शेठजी आठवड्यांतून एकदां तिला भेटण्यासाठीं नेमानें गोव्याला जात असत; व तेहि स्वतःसाठीं खास ठरविलेल्या बोटींतून—

त्यानंतर बापलेकांत पुन्हा कधीं त्या विषयावर बोलणें झालें नाहीं. रतिलालच्या बरोबर मधून मधून घरीं येणाऱ्या निरनिराळ्या जातींच्या मुली पाहिल्या, म्हणजे सनातनी शेठजींना केव्हां केव्हां अशी भीति वाटे कीं, आपला हा एकुलता एक मुलगा वाटेल त्या जातीच्या मुलीशीं लग्न करून शेवटीं घराण्याचें नांव तर बुडवणार नाहीं ना ? विशेषतः, मुंबईतील एका बड्या क्रोडोपति व्यापाऱ्याच्या मुलीशीं त्याचें लग्न जमण्याचा योग त्यांनीं जुळवून आणला असतां त्यानें

जेव्हां ती मुलगी करून घेण्याचें नाकारलें, तेव्हांपासून त्यांना त्याच्या भवितव्याविषयीं फार काळजी वाटूं लागली.

पण ते स्वतः त्याला सहसा बोलत नसत. त्याच्या आईकडून ते लग्नाचा प्रश्न वारंवार काढवीत. पण, बड्या शेठाणीच्या शब्दाला रतिलाल जरी एरवी फार मान देत असे, तरी या बाबतींत मात्र त्यानें आईचा आग्रह कधीं मनावर घेतला नाहीं.

आणि मग शेठाणी केव्हां केव्हां वैतागानें म्हणत असे, "तूं तरी कोणासारखा होशील, रति ? दर वर्षीं गोव्याहून नवी पोरगी आणायचा त्यांचा क्रम आतां पन्नाशीच्या घरांत आल्यावरहि थांबलेला नाहीं. इतकं चांगलं उदाहरण तुझ्या डोळ्यांपुढें असतांना तुला कशाला लग्न करावंसं वाटेल ?—"

पण कलाभिज्ञ, सुशिक्षित तरुणींच्या साहचर्याचा नित्य नवा आनंद लुटण्याचा रतिलालचा क्रम अव्याहत चालूं होता. शेठजींचा एकुलता एक तरुण मुलगा म्हणूनच केवळ नव्हे, तर त्यांच्या कंपनीचा तरतरीत मॅनेजर म्हणूनहि त्याला मुंबईतील वरिष्ठ वर्गांत चांगली प्रतिष्ठा लाभली होती; व त्यामुळें संपन्न, सुसंस्कृत वर्गाचे जे बुद्धिविलासाचे निरनिराळे चोचले नेहमीं चालूं असतात, त्यांत त्याला आदरपूर्वक स्थान दिलें जात असे. स्त्रीसौंदर्याची शिकार करावयाला निघालेल्या रतिलाल सारख्या लक्ष्मीपुत्राला असले कार्यक्रम म्हणजे एक पर्वणीच वाटे. आपल्या समानशील मित्रमैत्रिणींना घेऊन तो वर्षांतून दोनदां, कार्तिकी आणि फाल्गुनी पुनवेच्या सुमारास, या डाकबंगल्यावर बहुधा नियमानें येत असे; व जलक्रीडा, गिरिविहार आणि वनभोजन अशा तिहेरी कार्यक्रमांत त्यांचा मुक्काम मोठ्या मजेंत जावयाचा.

कांचनला जेव्हां त्यानें प्रथम आपल्या पारशी मैत्रिणीच्या घरीं पाहिली, तेव्हां त्याचें लक्ष तिच्या रूपापेक्षांहि तिच्या आंतल्या गांठीच्या किंचित् मानी, किंचित् सलज्ज वृत्तीनें जास्त वेधून घेतलें. शिकाऱ्याला जसें झुकांड्या देऊन दमछाक करणारें अचपळ सावज ईर्ष्येनें नादीं लावतें, तशी त्या अबोल किशोरीच्या प्रथम दर्शनानें रतिलालची अवस्था झाली.

पण कांचन स्वतंत्र नव्हती आणि सामान्यहि नव्हती.

मुंबईच्या प्रमुख वकिलांत तिच्या वडलांची गणना होत असे; व पाश्चात्य संस्कृतीचा सगळा गणवेष त्यांच्या वैभवशाली संसारावर चढलेला होता. कांचनचें सुरवातीपासूनच कॉन्व्हेंटमध्यें झालेलें सगळें शिक्षण हा त्यांतलाच एक प्रकार होता. पण, तिचे वडील पाश्चात्य रहाणीचे भोक्ते असले, तरी मुलींना एका मर्यादेपलिकडे स्वातंत्र्य देण्यांत असलेले धोकेहि त्यांना माहित होते; व त्याहिपेक्षां कांचनची सुशिक्षित आई ही मुलीवर नजर ठेवण्याच्या बाबतींत जास्त सावध होती.

पण, रतिलाल त्या दोघांच्याहि सावधागिरीला पुरून उरला. त्याची श्रीमंती आणि मर्यादशील मिठास वागणूक या दोहोंचीहि छाप कांचनच्या मातापित्यांच्या मनावर पडली; व आपल्या बहिणीला घेऊन त्यांच्या घरीं जाण्याची पद्धत त्यानें ठेवल्यामुळें कौटुंबिक स्नेह आणि विश्वास हीं दोन्हीं आपोआपच उत्पन्न झालीं. दिवाळी-सारख्या मोठ्या सणाच्या वेळीं किंवा कांचनच्या वाढदिवशीं रतिलाल आणि त्याची बहीण यांच्याकडून एकादी सुंदर भेट कांचनला आली नाहीं, असें कधीं होत नसे.

त्यामुळें कांचन कॉलेजांत गेल्यावर रतिलालनें जेव्हां आपल्या इतर कांहीं मैत्रिणींबरोबर तिला स्वतःच्या गांवीं येण्याचें निमंत्रण दिलें,

तेव्हां तिच्या आईबापांना तिला त्याच्याबरोबर पाठवावयाला कांहींहि शंका वाटली नाहीं.

त्यांचा कार्यक्रम फक्त चार दिवसांचा होता. पहिल्या दिवशीं त्यानें आपल्या मित्रमैत्रिणींना खाणी पहाण्यासाठीं नेलें. त्या पहाण्याच्या वेळीं चढउतार करित असतां कांचनला हात देतांना जी लगट त्यानें केली, ती तिला जाणवली. पण तिच्या मनांत कोणत्याहि प्रकारचें किल्मिष मात्र आलें नाहीं. आपल्या बरोबरच्या इतर मैत्रिणींशीं ज्या मोकळेपणानें तो वागतो, त्याच मोकळेपणानें तो आज प्रथमच आपल्याशीं वागत आहे, एवढेंच फक्त तिच्या मनांत आलें.

दुसऱ्या दिवशीं त्यानें टेकडीवरलें राममंदिर पहाण्यासाठीं त्यांना नेलें. मंदिर पाहून झाल्यावर इतर मंडळी तिथल्या तलावाच्या कांठीं गप्पा मारित बसली असतां, त्या टेकडीच्या पलिकडल्या बाजूच्या झाडींतून जीं मंदिरांचीं शिखरें वर डोकावत होतीं, तीं बघून कांचननें त्याला म्हटलें—

" हीं कोणतीं मंदिरें आहेत आणखी ?—"

" तीं जैन मंदिरें आहेत. तुला पाह्यचीं असतील, तर आपण चटकन् खालीं जाऊन बघून येऊं या—"

आणि ती एकटीच त्याच्याबरोबर डोंगराच्या उतारावर झाडींत असलेलीं तीं मंदिरें पाहण्यासाठीं गेली.

तीं मंदिरें आणि त्यांच्या भोंवतालचा रम्य देखावा बघत असतां रतिलालनें एकदम कांचनचा हात धरून तिला विचारलें—

" कांचन, तुला कसं काय आवडलं आमचं गांव ?—"

त्यानें एकाएकीं आपला हात धरला, हें कांहीं तिला रुचलें नाहीं. पण, त्याचा तो प्रश्न आणि बोलण्याची पद्धत इतकी कांहीं प्रांजळ होती कीं, त्याच्या हातांतून आपला हात सोडवून घेण्याचा प्रयत्न न करतां ती म्हणाली—

" मला कल्पना नव्हती मुंबईहून निघतांना तुमचं गांव इतकं सुंदर असेल अशी—"

" पण याहिपेक्षां सुंदर असं एक स्थळ पाह्यचं राह्यलंय आपलं अजून—"

" कुठं आहे तें ?—"

" इथून तीन चार मैलांवर. तुझी इच्छा असेल, तर आपण उद्यां संध्याकाळीं जाऊं तिथं—"

" इतकं सुंदर असेल, तर पाह्यलाच हवं नाहीं का तें ? "

" हो. एकदां बघितल्यावर विसर नाहीं पडणार तुला त्या स्थानाचा कधीं—"

नंतर तीं दोघें बोलत बोलत झाडींतलि पाऊलवाटेनें चढून वर आलीं.

तीं दोघें परत आलेलीं दृष्टीस पडतांच रतिलालच्या मैत्रिणींनीं एकमेकांकडे जे साभिप्राय कटाक्ष फेकले, ते कांचनच्या लक्षांत आले नाहींत; व तेव्हांपासून त्याच्या पारशी मैत्रिणीचें जें धुसफुसणें त्याच्याशीं सारखें सुरू झालें, त्याचाहि अर्थ तिच्या ध्यानांत आला नाहीं. उद्यां सायंकाळीं आपल्याला अत्यंत रमणीय अशा ठिकाणीं जावयाला मिळणार या कल्पनेच्या आनंदांत ती गर्क होती.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं रतिलाल आपल्या त्या पारशी मैत्रिणी-बरोबर एकटाच फिरावयाला म्हणून जो गेला, तो दुपारीं जेवणाच्या वेळीं परत आला. जेवण झाल्यावर ब्रिज खेळावयाला बसतांना त्यानें कांचनला हळूच म्हटलें—

" मग संध्याकाळीं जायचं ना आपण ?—"

" हो. तुम्हाला कांहीं काम नाहीं ना दुसरं ?—"

" नाहीं. फक्त तुला आठवण आहे कीं नाहीं हें बघण्यासाठीं विचारलं—"

संध्याकाळीं चहापान झाल्यावर बाकीची मंडळी टेनिस खेळा-वयाला चालली असतां रतिलालनें तिला म्हटलें—

" मला वाटतं निघावं आतां आपण—"

" पण परत केव्हां यायचं ?—"

" येऊं जेवायच्या वेळेपर्यंत—"

" यांच्यापैकीं कोणाला नाहीं घेत बरोबर ?—"

" नाहीं. त्यांनीं सगळ्यांनीं पाह्यलंय तें ठिकाण. मग निघूं या आतां आपण —"

तीं दोघें मोटारींत बसलीं आणि सूर्यास्ताच्या सुमारास त्या डाकबंगल्यावर आलीं.

त्यानें मोटारींतून उतरल्यावर प्रथम तिला रामसागरावर नेली आणि सायंप्रभेंत चकाकणाऱ्या त्या सुंदर जलाशयासमोर उभी केली.

तो जलाशय अगदीं शांत होता. आकाशांतील रंगीबेरंगी ढगांच्या सांवल्या पडून त्याच्या पाण्यांत वेगवेगळया रंगांचे पट्टे उत्पन्न झाले होते. मधून मधून पाण्यांतून वर उसळी मारणारे मासे आणि त्यांना पकडण्यासाठीं पाण्यावर झेप घालणारे पक्षी यांच्या हालचालीमुळें जी काय खळबळ पाण्यांत होत होती, तेवढीच. एरवीं तें संथ पाणी संधिप्रकाशांत फिक्या निळया सॅटिनीसारखें चमकत होतें. क्षितिजावर चढलेलें चंद्राचें निस्तेज बिम्ब, सूर्य अद्याप बुडालेला नसल्यामुळें, डोळ्यांत भरत नव्हतें; व त्याची सुषमाहि जाणवूं लागली नव्हती.

तें शांत, सुरम्य दृश्य पाहून कांचन मुग्ध झाली. संध्येच्या उदास शांततेंत जी अबोध उत्कंठा ओथंबलेली असते, तिनें तिचें हृदय भरून आलें आणि तिच्या डोळ्यांत आसवें आलीं.

" कांचन असं काय करतेस ? कुणाची आठवण झाली तुला इथं आल्यावर ?—"

रतिलालनें हळूच तिचा हात आपल्या हातांत घेऊन विचारलें.

तिनें डोळे पुसले आणि हंसून म्हटलें—

" छे, कुणाची आठवण होणार ?—"

" मग पाणी का आलं डोळ्यांना तुझ्या ?—"

" कुणाला ठाऊक. मलाहि तें कळलं नाहीं. मग तुम्हाला कसं सांगूं ?—"

" विचित्र मुलगी आहेस तूं !—"

त्यानें तिच्या गालावर चापट मारून म्हटलें.

गेल्या दोन दिवसांत त्या दोघांची सलगी सारखी वाढत चालली होती. पण ती गोष्ट कांचनच्या लक्षांत आली नाहीं.

संधिप्रकाश नाहींसा होऊन चंद्राच्या पीतगौर प्रभेचा झोत राममागराच्या पाण्यावर पडला, तरी त्यांना तेथून उठण्याची इच्छा होईना. पण मग हवेंतला गारठा अंगाला झोंबू लागल्यामुळें तीं दोघें उठलीं आणि डाकबंगल्यांत परत आलीं.

ज्या खोलींत आज ती उतरली होती, त्याच खोलींत रतिलाल तिला त्या दिवशीं घेऊन आला.

तोच ड्रेसिंग टेबलाचा आरसा आणि वाऱ्याच्या झुळकेबरोबर सुगंध उधळणारे तेच निशिगंधाचे अर्धवट उमललेले कळे—

" आपण कॉफी घेऊं या कांचन थोडी—"

" पण लगेच निघायचं बरं का ! तलावावरून उठेपर्यंत कळलं नाहीं रात्र किती होऊन गेली हें—"

" पण फार उशीर नाहीं झालेला, कांचन. अजून सातसुद्धां नाहीं वाजले. आपण कॉफी घेऊन थोडेसे बगिचांत हिंडूं न् मग निघूं–"

" बरं—"

सलामनें कॉफी आणून टेबलावर ठेवली आणि रतिलालकडे एकवार पाहून तो मागल्या मागें अंधारांत नाहींसा झाला.

कांचननें तयार करून पुढें ठेवलेल्या कॉफीचा एक घोट रतिलालनें घेतला; व खिशांतून सोन्याचें नक्षीकाम केलेली सुंदर डबी काढून सिगारेट पेटवली.

तो मुकाट्यानें सिगारेटचे झुरके आणि कॉफीचे घोट आलटून पालटून घेत होता; व कांचनहि स्तब्ध होती.

त्या जागेंतल्या एकान्त, नीरव शांततेनेंच की काय कांचनचें मन भारावल्यासारखें झालें होतें. ती कांहीं बोलली नाहीं आणि तिच्या वृत्तींतला बदल न्याहाळण्यांत व्यग्र असल्यामुळें त्यालाहि कांहीं बोलण्याचें सुचलें नाहीं.

'माचावर बसलेला शिकारी सावजाची हालचाल जशी एकाग्रतेने टेहळीत असतो, तसा तिच्या वृत्तींतला हर एक बदल तो बारकाईनें पहात होता.'

कॉफीचा शेवटचा घोट संपवून कप खालीं ठेवतांना ती म्हणाली—

" आतां बगीचांत फिरायचं ना थोडा वेळ ?—"

" हो—"

तो लगेच उठला आणि तीं दोघें बंगल्याच्या मागल्या बाजूला आलीं.

टेकडीच्या मागल्या बाजूचें त मैदान, चंद्र आतां बराच वर आलेला असल्यामुळें, धुरकट चांदण्यानें भरून गेलें होतें; व हवेंतला गारठा झपाट्यानें वाढत होता.

तीं दोघेंहि मुकाट्यानें हळुहळू चालत होतीं.

जणुं हवेंतल्या त्या कुंद धूसरतेनें त्यांच्या मनोवृत्तीहि कुंद करून सोडल्या होत्या.

बगीचांतल्या त्या एकान्त सहलींत तो एक शब्दहि बोलला नाहीं, त्यानें तिला एकदांहि स्पर्श केला नाहीं.

कांहीं वेळानें ती म्हणाली—

" परत जाऊं या आपण आतां—"

" ठीक आहे—"

तो म्हणाला आणि तीं दोघें खोलींत परत यावयाला निघालीं.

आंत आल्यावर तो खिडकीजवळ गेला आणि तिला म्हणाला—

" कांचन, आतां पहा रामसागर इथून कसा दिसतोय तो—"

त्याबरोबर ती उत्सुकतेनें त्याच्याजवळ येऊन उभी राहिली.

मघांशीं दिसलेला पाण्याचा नीलिमा आतां आजिबात लुप्त झाला होता. चंद्रबिम्बांतून सहस्रधारांनीं स्रवणारें सगळें तेजच जणुं प्रवाही होऊन समोर हेलावत होतें; व शरदाची सगळी परिणत, प्रसन्न शांति त्या गंभीर वातावरणांत भरली होती.

पहातां पहातां कांचनच्या डोळ्यांतून टिपें पडूं लागलीं.

" कांचन, हें काय पुन्हा वेड्यासारखं ?—"

त्यानें तिला जवळ घेऊन म्हटलें.

त्याबरोबर तिनें चटकन् डोळे पुसले आणि ती म्हणाली—

" निघूं या आपण आतां—

" कां बरं ? तुला आवडलं नाहीं का हें ठिकाण ?—"

" आवडलं. पण कससंच होतंय मला इथं आल्यापासून. म्हणून म्हणतें निघूं या आतां—"

आणि ती आपले केस नटिनेटके करण्यासाठीं आरशासमोर उभी राहिली.

तोंच आपल्या वेणींतला निशिगंधाचा पांढरा शुभ्र गुच्छ तिच्या दृष्टीस पडला.

तिनें तो वेणींतून काढला आणि त्याचा वास घेत हर्षभरानें म्हटलें—

" रतिलाल, किती सुंदर आहेत फुलं हीं !—"

" हो. इथं सगळंच कांहीं सुंदर आहे, कांचन. असला सोळा पाकळ्यांचा निशिगंध सहसा मिळत नाहीं पाह्यला कुठं—"

तिनें त्या गुच्छाचा पुन्हा एकदां वास घेतला आणि आरशाकडे तोंड करून तो वेणींत खोंवला.

तोंच रतिलालनें तिला मागून झटकन् हातानें घट्ट लपेटली; व तिला कसली जाणीव होण्यापूर्वींच त्याचे ओंठ तिच्या जिवणीच्या कडेला भिडले.

आरती कुलकर्णी

ती सुन्न झाली—

पण कांहीं क्षणच.

त्याच्या घट्ट कवेंतून तिनें आपल्याला सोडवून घेतलें आणि संतापानें थरथरा कांपत ती त्याला म्हणाली—

" एवढ्याचसाठीं तुम्ही मला इथं आणलंत कां, रतिलाल ? "—

" मी आणलं नाहीं. तूं आलीस, कांचन ! – "

त्यानें अगदीं शांतपणानें हंसत हंसत तिला म्हटलें.

" हो, मी आलें. पण तुम्ही आणलंत म्हणूनच आलें ना ? मला कल्पना नव्हती तुम्ही अशा प्रकारचे इसम असाल अशी—"

" मी वाईट काय केलं, कांचन ? तुझा राग कमी झाल्यावर तुझं तुलाच कळून येईल कीं, असल्या सुंदर ठिकाणीं इतक्या सुंदर रात्रीं आल्यावर जी गोष्ट करणं अगदीं स्वाभाविक आहे, तीच आपण केली–"

" रतिलाल ?—"

तिच्या तोंडून संतापानें शब्द फुटेना.

पुढं मध्यरात्रींपर्यंत घडलेला सगळा प्रकार, त्या प्रसंगाचा प्रत्येक क्षण न् क्षण तिच्या डोळ्यांपुढं उभा राहिला आणि त्यांतून घळघळा अश्रु वाहूं लागले.

त्या दिवशीं रात्रीं त्या खोलींत जो प्रकार घडला, तो आपणा दोघांशिवाय दुसऱ्या कुणालाहि माहित नाहीं. खानसामा आणि चौकी-

दार हे दोघे जरी बंगल्याच्या आवारांत रहात असले, तरी त्यांच्या खोल्या बंगल्यापासून किती तरी दूर आहेत.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं चहाच्या वेळीं जव्हां आपण रतिलालच्या मित्रमैत्रिणींच्या दृष्टीस पडलों, तेव्हां त्यांनीं एकमेकांकडे पाहून केलेलें स्मित लक्षांत येतांच रतिलाल अगदीं गंभीरपणानें त्यांना इंग्रजींत म्हणाला—

" मी आपल्याला एक आनंदाची न् महत्वाची गोष्ट सांगतों. काल रात्रीं कांचननं माझ्या लग्नाच्या विनंतीला उदार मनानं रुकार दिला—"

त्याच्या त्या बोलण्यामुळें तीं सहेतुक स्मितं क्षणार्धांत जिरलीं आणि कोणत्याहि प्रकारची वाच्यता न होता मार्गशीर्षांत रतिलालशीं आपलें थाटानें लग्न झालें.

आपल्या जीवनांतलें कोणालाहि माहित नसलेलं हं रहस्य !— त्याच्यावर नेमकें या तरुणानें कसें बोट ठेवलें? आपल्या हृदयाची निर्गांठ उकलण्याचा प्रयत्न त्याला कसा साधला? —

तिला राहून राहून आश्चर्य वाटत होतं त्याच्या त्या बोलण्याचें.

आणि आश्चर्याबरोबर भीतीहि. मात्र त्या भीतीचं तिला कारणहि कळेना, उलगडाहि होईना.

म्हणून तिनें ठरवून टाकलं कीं, कांहीं झालं, तरी रात्रीं कांहीं आज इथें रहावयाचें नाहीं.

मनाचा अशा रीतीनें निर्धार केल्यावर तिनें तोंड स्वच्छ धुतलें आणि दुपारच्या जेवणाला अद्याप चांगला तास दीड तास अवकाश असल्यामुळें आपल्या बॅगमधलीं पुस्तकें बाहेर काढलीं.

तिनें दोन तीन इंग्रजी पुस्तकें घाईघाईनें उघडून चाळलीं. पण कोणत्याच पुस्तकांत तिचें मन रमेना. म्हणून ती उठली आणि बगीचाच्या मागल्या बाजूला आली.

ऊन आतां चांगलेंच कडकलें होतें; व हवेंतला गारठाहि करपत चालला होता.

त्या उन्हांतून हिंडणेंहि तिला बरें वाटेना.

आणि तिच्या मनांत आलें, त्या तरुणाला एक दिलगिरीची चिठी लिहून ठेवावी आणि आतांच मोटारींत बसून परत आपल्या बंगल्यावर जावें—

ह्मणून ती बंगल्याकडे जावयाला परत फिरणार, तोंच ती आतां परिचित झालेली इंग्रजी गाण्याची शीळ तिच्या कानांवर पडली आणि लगेच असा प्रश्नहि विचारलेला ऐकूं आला—

" तुह्मीहि फिरायला गेला होतात का ? — "

" नाहीं. खोलींत करमेना ह्मणून हिंडत होतें सहज बगीचांत– "

" जेवायला थोडा वेळ आहे अजून नाहीं का ? — "

आपल्या रुंद मनगटावरल्या घड्याळाकडे पहात त्यानें स्वतःशीच बोलावें त्याप्रमाणें म्हटलें; व नंतर तो उद्गारला—

" वेळ असेल, तर स्नान करतां येईल मला पुन्हा. चल जिम, खालीं तलावावर जाऊं या — "

त्याचा तो उद्गार कळल्यामुळेंच कीं काय जिमनें एक उडी मारून पुढें धांवावयाला सुरवात केली.

ती स्तब्ध उभी होती.

तिच्या कानावर पडणारी त्याची शीळ आपल्या हृदयाला कंपित करित आहे, असें तिला वाटलें.

आणि तिला स्वतःचा मनस्वी राग आला.

तो तरुण अनायासें आपल्याला भेटला असतां आपण दिलगिरी व्यक्त करून आपला ताबडतोब निघण्याचा विचार त्याला का सांगितला नाहीं ?

त्या रागाच्या भरांत ती खोलींत आली. आपल्या हातांतली मनि-बॅग न् छत्री तिनें टेबलावर टाकली आणि ब्लाऊजला अडकवलेलें पेन काढून तिनें लिहावयाला प्रारंभ केला—

तोंच चौकीदार आंत येऊन म्हणाला—

" साहेब विचारतात, जेवणाचा इंतजाम कुठं करायचा ? आपल्या खोलींत की त्यांच्या ? आपल्या हुकमाप्रमाणें तयारी करायला सांगितली आहे त्यांनीं — "

" जेवणाची वेळ झाली इतक्यांत ? — "

" थोडी देर आहे अजून. ते खालीं स्नानाला गेले आहेत. ते परत येईपर्यंत आम्ही तयारी ठेवतों सगळी. मग कुठं करायचा इंतजाम ? — "

आपल्यासमोर अदबीनें उभ्या असलेल्या त्या बुढ्याकडे तिनें न्याहाळून पाहिलें.

पण त्याची मान खालीं लवलेली होती.

तिनें पेनला टोपण लावलें आणि किंचित् कठोर आवाजांत म्हटलें—

" ठाकूर, मी आज जेवण झाल्याबरोबर परत जाणार आहे, हें माहित आहे ना तुला ? — "

" हो. शोफरनं मघाशींच सांगितलं— "

तो ह्मणाला आणि क्षणैक थांबून त्यानें पुन्हा विचारलें—

" मग जेवणाचा इंतजाम कुठं करायचा, बाईजी ? — "

" तें तुला समजत नाहीं का, ठाकूर ? ते तुझे साहेब एक नवीन असतील. पण तूं तर इतके दिवस पहातो आहेस ना मला ? तुला एवढी साधी गोष्ट समजत नाहीं ? — "

" कसूर माफ करा, बाईजी ! साहेब मला ह्मणाले, माझ्याच कमऱ्यांत जेवणाचा इंतजाम कर ह्मणून. पण मी त्यांना सांगितलं कीं, आपण कधीं दुसऱ्याच्या कमऱ्यांत जेवत नाहीं — "

" असं सांगितलंस तूं त्यांना ? न् मग ते काय ह्मणाले ? — "

" ते मला ह्मणाले, " मी मघाशीं जेवणाची गोष्ट काढली, ह्मणून माझ्या कमऱ्यांत इंतजाम करणं योग्य होईल असं वाटतं मला. पण बाईच्या मर्जीविरुद्ध कांहींहि करायची इच्छा नाहीं माझी. तूं विचारून पहा एकदां त्यांना; न् त्यांच्या हुकमाप्रमाणें व्यवस्था कर. " ह्मणून मी विचारायला आलों आपल्याला. मग आपल्याच कमऱ्यांत करतों इंतजाम — "

" हो— "

चौकीदार मागल्या मागें निघून गेला आणि कांचन खोलींत जाऊन कपडे बदलण्याच्या तयारीला लागली.

## ६

कांचन कपडे बदलून बाहेर आली, त्या वेळीं धनंजय व्हरांड्यांत उभा राहून कमानीवर पसरलेल्या चित्रांगाच्या वेलाला आलेल्या पांढऱ्या तांबड्या फुलांच्या घोसांशी खेळत होता.

" तुमचा जिम कुठं आहे ? — "

तिनें त्याला हंसून विचारलें.

" तो चौकीदाराच्या मागोमाग चौकशी करायला गेलाय जेवण अजून का आलं नाहीं याची — "

त्यानें उजव्या कानाशिलावर झुकलेली केसांची बट मागें सारून हंसत हंसत म्हटलें.

स्नानानंतर आलेल्या घामाच्या थेंबांची बारीक ओळ, त्याच्या उंच कपाळावर जे आठ्यांचे तीन कंगोरे उठले होते, त्यांवर सांकळली होती;

व:काळ्याभोर स्निग्ध केसांतून जी भांगाची शुभ्र रेषा डाव्या बाजूला गेली होती, तिच्यावरहि घर्मबिंदु चकाकत होते. नाजूक रेशमी फुलें काढलेला मलमलीचा सदरा त्यानें या वेळीं घातला होता.

ती हिरव्या किनारीचें जें उमरेडी पांढरें पातळ नेसली होती, तें तिच्या प्रसन्न वृत्तीला खुलून दिसत होतें.

" खरंच, अजून जेवणाची तयारी कशी केली नाहीं ठाकूरनं ?—"

" मला वाटतं त्याच्या अंदाजापेक्षां लवकर स्नान आटपलं माझं — "

आणि नंतर एकदम त्यानें तिच्या नजरेला नजर भिडवून विचारलें—

" तुम्ही नेहमीं एकट्याच राहता का या बंगल्यावर ? "

" हो. का बरं ? — "

" विशेष कांहीं नाहीं. कंटाळा कसा येत नाहीं तुम्हाला इथं एकट्यानें रहाण्याचा ? — "

" या ठिकाणाची रम्यता हीच मुळीं एक सोबत वाटते मला—"

" तुमचं उत्तर मार्मिक आहे. पण समाधान नाहीं झालं त्यानं माझं — "

" समाधान हें ज्याच्या त्याच्या वृत्तीवर न् अनुभवावर अवलंबून असतं नव्हे का ? — "

" मग तुह्मांला मी एक प्रश्न विचारला, तर राग मानतां कामा नये तुह्मी — "

" कोणता प्रश्न ? — "

" तुमची वृत्ति इतकी चमत्कारिक न् एकलकोंडी बनायला कोणता अनुभव आला तुह्मांला ? — "

तो हा प्रश्न विचारीत आहे, तोंच चौकीदार न् त्याच्या पाठोपाठ खानसामा हे तार्टे घेऊन आले; व खोलींतल्या टेबलावर त्यांनीं पात्रांची मांडामांड केली.

त्यांच्यापुढें उड्या मारित आलेला जिम मात्र आंत न जातां व्हरांड्यांत धनंजयभोंवती घुटमळत राहिला.

तीं दोघें खुर्चीवर बसलीं आणि मेजावरील नॅपकिन मांडीवर पसरून जेवावयाला सुरवात करणार तोंच धनंजयनें आश्चर्यानें विचारलें—

" हें काय ? तुमच्या न् माझ्या ताटांतले पदार्थ निराळे दिसतात अगदीं — "

" हो. मी शाकाहारी आहे — "

" मग मीहि तोच आहार घेतला असता आजच्या दिवस — "

" पण तसं करण्याची कांहीं गरज नव्हती — "

" तुह्मी कधींच आहार घेत नाहीं का हा ? — "

" नाहीं. दहा वर्षांपूर्वी तो जो मी एकदां सोडला तो सोडला— "

" कांहीं विशेष कारणामुळं सोडला ? — "

त्यानें चटकन् विचारलें.

पण तो प्रश्न ऐकतांच तिच्या त्या टपोऱ्या, शांत डोळ्यांत जी मनोवेदनेची चमक उठली, ती त्याच्या लक्षांत आली आणि तो उद्गारला—

" मी जो जो प्रश्न मघापासून तुह्माला विचारतों, तो तो तुमच्या मनस्तापाला कारण होतो असं दिसतंय — "

" असंच केवळ नाहीं. पण इतक्या थोड्या ओळखीनंतर ज्या धिटाईनं न् सलगीनं तुह्मी मला मघांपासून कांहीं ना कांहीं विचारतां आहांत, तिचं मात्र नवल वाटतं मला — "

" त्यांत नवल वाटण्यासारखं कांहीं नाहीं. माझ्याप्रमाणं तुमचं जर मुशाफरी जीवन असतं, तर तुमच्याहि ठिकाणीं ही पहिल्याच भेटींत धिटाई न् सलगी करण्याची वृत्ति आली असती. त्या वृत्तीमुळंच तर आमचं हें चिरप्रवासी जीवन सुखकर करून घेतां येतं आह्माला — "

" पण असले प्रश्न विचारणारा माणूस भेटला नव्हता मला पूर्वी कधीं — "

" आणि तोहि असल्या एकान्त ठिकाणीं — "

तिचें वाक्य पूर्ण करण्यासाठीं ह्मणून त्यानें उच्चारलेल्या त्या शब्दांचा तिच्यावर विलक्षण परिणाम झाला आणि तिची मुद्रा एकदम लाल होऊन गेली —

त्याला वाटलें, ती आतां जेवण टाकून ताटावरून उठते कीं काय ? —

पण लगेच तिनें हंसून ह्मटलें —

" हो — "

पण त्या हास्याची कृत्रिमता त्याच्या ध्यानांत आली आणि त्यानें विचारलें —

" माझा सहवास तुह्माला तापदायक तर होत नाहीं ? — "

" अजून तरी नाहीं. शिवाय मी जेवल्याबरोबर लगेच परत जाणार असल्यामुळं सहवासाचा प्रश्नच मुळीं उद्भवत नाहीं — "

तिच्या तोंडचें तें अनपेक्षित वाक्य ऐकतांच तो चमकला आणि हातांतला चमचा खालीं ठेवून ह्मणाला —

" तुमच्यावर माझा सहवास लादण्यांत मी चूक केली असं वाटतं मला आतां. मघांशींच मी तुह्मांला जाऊं द्यायला हवं होतं. तुह्माला राहण्याचा आग्रह करण्याचा कांहीं एक हक्क नव्हता मला — "

ती मुकाट्यानें खालीं मान घालून ऐकत होती.

" पण, तुह्माला बघितल्याबरोबर, का कोण जाणं, तुमच्याविषयीं

माझ्या मनांत कुतूहल उत्पन्न झालं. वाटलं कीं, तुमच्या सहवासाचं भाग्य जर लाभलं, तर आजचा दिवस फार आनंदांत जाईल आपला; न् आयुष्यभर हृदयांत अभिमानानं जतन करून ठेवावी अशी एक अनुभूति, एक स्मृति या रम्य ठिकाणाहून आपण उद्यां घेऊन जाऊं — "

ती स्तब्ध होती. फक्त तिच्या डोळ्यांतून आसवांचे दोन मोठे थेंब ताटांत पडले.

तिनें ताट बाजूला सारलें आणि मेजाच्या कोपऱ्याला ठेवलेल्या हातरुमालानें डोळ्यांच्या कडा टिपून ती ह्मणाली —

" धनंजय, माझा आतां जाण्याचा विचार मी सोडून दिल्यानं समाधान होईल का तुमचं ? — "

" हा केवळ माझ्या समाधानाचा प्रश्न आहे का ? तुह्मी इथं राह्यलांत न् आपण नुसतं औपचारिक बोलून दिवस काढला, तर काय आनंद आहे त्यांत मला ? — "

" अगदीं पहिल्या भेटींत मी तुमच्याशीं अनौपचारिक व्हावं अशी का अपेक्षा करतां तुह्मी ? — "

" माझी अपेक्षा अगदीं साधी न् सरळ आहे. तुह्मी सगळे उप-चार सोडून देऊन जर माझ्याशीं वागलांत, तर आपला दोघांचाहि हा मुक़ाम फार आनंदांत जाईल — "

आणि बाजूला उभ्या असलेल्या चौकीदाराकडे वळून तो ह्मणाला —

" हें ताट घेऊन जा न् दुसरं ताट आण बाईसाठीं — "

" नको. माझी वासना नाहीं मुळींच अन्नावर — "

ती थोड्या काकुळतीनें ह्मणाली.

" मला वाटतं, तुह्मी इथं राह्यल्यानं तुमचा मनस्ताप वाढेल मात्र. त्यापेक्षां तुह्मी आतां गेलांत, तर बरं होईल — "

" आणि मी राह्यचं ठरवलं तर ? — "

“ तुह्माला मोकळेपणानं वागावं लागेल माझ्याशीं — ”

त्यानें हंसून ह्मटलें.

त्याच्या त्या अव्याज उत्तरानें तिलाहि हंसूं आलें.

“ पण मी जेवतोंय न् तुह्मी नुसत्या बोलतां आहांत. तुह्मी कांहीं तरी खाल्लं पाहिजे माझ्याबरोबर — ”

आणि, तो चौकीदाराला कांहीं सांगणार, तोंच ती ह्मणाली—

“ तुह्मी खूप फिरून आलांत न् पोहलांतहि. त्यामुळं तुह्माला भूक लागली आहे सपाटून. पण मी नुसती खोलींत बसून होतें. त्यामुळं मला भूक नाहीं मुळींच. तुमचा आग्रहच आहे, तर या ताटांतलंच मी खाईन आणखी थोडसं — ”

अशा रीतीनें जेवणाला पुन्हा सुरवात झाली.

“ तुह्मी शाकाहार का सोडलांत हें सांगितलं नाहींत मला? तुमची कांहीं हरकत नसेल सांगायला, तर मला इच्छा आहे फार ऐकायची—”

“ तशी हरकत कांहींच नाहीं. मी शाकाहार सोडला, तो गुरूपदेश घेतल्यामुळं — ”

तिनें हंसत हंसत ह्मटलें.

“ गुरूपदेश ? आणि तो केव्हां न् कशाला घेतलात तुह्मी ? — ”

“ गुरूपदेश घेतल्याला दहा वर्षं होतील आतां — ”

“ इतका संसाराचा कंटाळा कशामुळं आला तुह्मांला ऐन तारुण्यांत ? — ”

" मला आज हंसू येतंय त्या प्रकाराचं. पण ती एक कंटाळवाणी न् दुःखदायक रामकहाणी आहे, धनंजय — "

" तुझाला जर ती सांगतांना दुःख होणार नसेल, तर मला ती ऐकण्याची उत्कंठा आहे फार — "

" आपण असं करूं. तुम्ही जेवण उरकून घ्या. आपण मग दिवाणखान्यांत बसूं न् मी सांगतें तुझांला ती हकीकत — "

" माझं जेवण झालं — "

तो एकदम खुर्चीवरून उठून म्हणाला.

" किती उतावळे आहांत तुम्ही, धनंजय ? — "

तिनें त्याची ती आतुरता पाहून हंसून म्हटलें.

तो हात धुऊन दिवाणखान्यांत आला, त्या वेळीं चौकीदारानें टेबलावर मुरादाबादी तबकांत व्यवस्थित जुळवून ठेवलेले विडे त्याच्या दृष्टीस पडले.

त्यांतला एक विडा तोंडांत कोंबून त्यानें कोचावर लेटत कांचनला म्हटलें —

" तुम्हीं सांगतां ना आपली रामकहाणी आतां ? — "

" हो. पण ती रामकहाणी तुम्हांला नीट समजण्यासाठीं प्रथम लग्नाची हकीकत सांगितली पाहिजे मला आपल्या — "

बोलतां बोलतां एकदम तिचा चेहरा लाल झाला आणि ती आंवंढा गिळून म्हणाली —

“ सकाळीं चहा घेतांना तुह्मी मला ह्मणालांत, तुमचं कांहीं तरी जीवनरहस्य या खोलीशीं संलग्न झालेलं आहे — ”

“ हो — ”

“ तो तुमचा तर्क बरोबर आहे अगदीं — ”

आणि नंतर तिनें आपल्या लग्नापूर्वी पलिकडल्या खोलींत घडलेल्या आपल्या आणि रतिलालच्या प्रथम मीलनाचा प्रसंग त्याला सांगितला.

तो स्तब्ध होता. ती मधून मधून बोलत होती आणि मधून मधून अश्रु गाळीत होती.

लग्नाची हकीकत सांगून झाल्यावर ती थांबली.

तो मुकाट्यानें सिगारेट पीत होता.

तोंच शोफर आंत येऊन अदबीनें ह्मणाला —

“ गाडी बाहेर आणून उभी केली आहे — ”

त्याचा आवाज कानांवर पडतांच धनंजयच्या पायांशीं पसरलेला जिम डोळे किलकिले करून निजल्या जागींच गुरगुरला.

जणुं त्यांच्या संभाषणांत आलेला तो व्यत्यय त्याला सहन झाला नाहीं.

त्या दोघांनीं क्षणमात्र एकमेकांकडे बघितलें आणि नंतर ती शोफरला ह्मणाली —

“ तुझं जेवण झालं ? — ”

“ हो — ”

“ मग असं कर. तूं गाडी घेऊन बंगल्यावर जा. माझा कांहीं आतां निघायचा विचार नाहीं. मला वाटलंच तर मी चौकीदाराला पाठवीन बंगल्यावर. पण मुलांचा खोळंबा व्हायला नको उगाच गाडी नसल्यामुळं — ”

“ मग लगेच निघतों मी — ”

“ ठीक — ”

शोफरनें त्या दोघांकडे एकवार नजर फेकली आणि तो मुकाट्यानें बाहेर पडला.

“ तुमचे आभार मानतों मी मनापासून — ”

त्यानें सिगारेटचें थोटूक रक्षापात्रांत टाकतांना ह्मटलें.

ती कांहीं बोलली नाहीं.

पण तिची अस्वस्थता त्याच्या लक्षांत आली आणि तो ह्मणाला—

“ मला वाटतं, तुह्मी विश्रांति घ्या आतां थोडी. मग संध्याकाळीं चहा घेतल्यावर हिंडायला जाऊं आपण — ”

“ बरं आहे — ”

“ चल जिम — ”

जिमनें उठून हात पाय ताणले आणि कान झटकून तो त्याच्या मागोमाग निघाला.

कांचन लगेच उठून आपल्या खोलींत आली आणि बिछान्यावर पडली.

पण तिच्या मनाची अस्वस्थता सारखी वाढत होती.

आपला जाण्याचा बेत अशा रीतीनें दुसऱ्यांदा रद्द करण्यांत आपण चांगलें केलें कीं वाईट केलें, हें तिला समजेना; व त्याहीपेक्षां लग्नाची हकीकत त्याला सांगितल्यानंतर जो पुढला प्रकार त्याला सांगावयाचें तिनें कबूल केलें होतें, त्याची आठवणहि तिच्या मनाला चैन पडूं देईना.

ती उठली, सुरईतलें थंड पाणी तिनें डोळयांना लावलें आणि ती पुन्हा बिछान्यावर पडली.

पण, तिचें मन इतकें कांहीं बेचैन झालें होतें कीं, तिला बिछान्यावर निजावेसें वाटेना किंवा बाहेरहि उठून यावेसें वाटेना.

जुन्या दुःखद आठवणींनीं बेसुमार चाळवलेलें तिचें मन त्या आठवणींच्या आवर्तांतून बाहेर पडावयाला तयार नव्हतें जणुं कांहीं —

आपल्या वैवाहिक जीवनाची हकीकत त्याला सांगतांना नवरा आणि सासरा यांच्याविषयीं कोणत्याहि प्रकारचा दुरुद्गार तिनें काढला नाहीं. पण, त्याच्यापाशीं ज्या संयमानें ती बोलली होती, तो संयम आतां टिकला नाहीं. संतापानें तिचें भान नाहीसें झालें आणि जलाशय खवळतांच त्याच्या तळाशीं असलेले हिंस्र जलचर जसे उसळून वर यावे, तशा गेल्या सोळा सतरा वर्षांतल्या नाना प्रकारच्या चीड आणणाऱ्या घटना तिच्या डोळयांपुढें उभ्या राहिल्या.

आणि, तिच्या मनांत आलें, ज्या वैवाहिक जीवनाचा उगम जबरदस्तींतून झाला, तें जीवन दिवसेंदिवस जास्त जास्त जहरी होत जावें, यांत नवल काय ? गतिलाल वारल्याला आतां आठ वर्षें होऊन गेली होतीं. पण, आपल्या जीवनांत मुरलेल्या त्या जहराची तीव्रता आणि दाहकता मात्र अद्याप कांहीं कमी झालेली नाहीं—

आपला नवरा आणि सासरा हे कांहीं तसे दुष्ट नव्हत. दुनिया त्याना सभ्य आणि उदार म्हणूनच ओळखते. पण, विषयलंपटतेमुळें सभ्य माणसेंहि कशीं दुष्ट बनतात आणि स्वतःबरोबर दुसऱ्याच्याहि जीवनांत विष कालवून त्याचा कसा नाश करतात, याचा तिचें वैवाहिक जीवन हा एक नमुना होता.

नवऱ्याच्या मृत्यूनंतर तरी या दुष्ट परिस्थितीच्या भोंवऱ्यांतून आपण बाहेर पडूं, अशी आशा तिला वाटली होती. इतकेंच नव्हे, तर स्वतःच्या वांट्याची मिळकत वेगळी करून घेण्याचा जो अट्टाहास तिनें केला, तो या उद्देशानें कीं, सासऱ्याशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध येण्याचा प्रसंग यापुढें आपल्यावर येऊं नये आणि आपलें उर्वरित जीवन तरी आपल्याला स्वतंत्रपणानें घालवितां यावें—

पण तिची ती आशाहि सफल झाली नाहीं.

माणसाचें जीवन हें त्याचें स्वतःचें एकट्याचें नसतें, इतर अनेकांच्या जीवनाचा प्रभाव आणि परिणाम त्याच्या जीवनावर सतत होत असतो, त्याचें वैयक्तिक जीवन हा एकंदर मानवी जीवनशृंखलें-तला केवळ एक दुवा आहे, हें तिच्या दिवसेंदिवस अधिकाधिक अनुभवाला येत गेलें. आणि त्यामुळें तिच्या मनांत केव्हां केव्हां असा भयंकर विचार येऊन जाई कीं, ज्या वैवाहिक बंधनाच्या

काचांतून नवऱ्याच्या मरणानें आपण मुक्त झालों नाहीं, त्यांतून कायमचें मुक्त होण्याचा आतां फक्त एकच मार्ग आहे आणि तो म्हणजे आपला स्वतःचा मृत्यु—

आणि तसें तिला वाटावें असाच खरोखरी तिचा गेल्या पंधरा सोळा वर्षांचा अनुभव होता.

रतिलालशीं तशा रीतीनें तिचें लग्न झाल्यानंतर कांहीं दिवस तो तिच्यावर इतका कांहीं आसक्त होता कीं, त्याचा तो सहवास म्हणजे तिला निव्वळ जुलूम वाटे. वडे शेठजी आणि विशेषतः शेठाणी यांना ही शिकली सवरलेली सून जरी पसंत नव्हती, तरी मुलगा आणि सून यांचें तें प्रेम पाहून त्यांना हर्ष होई. कारण तीं दोघें नातवाचें तोंड पहावयाला आतुर झालेलीं होतीं.

पण, रतिलालचा प्रणय आणि शृंगार हीं दोन्हीं इतकीं शारीरिक, इतकीं उद्दाम स्वरूपाचीं होतीं कीं, कांचनच्या प्रीतिविषयींच्या सगळ्या नाजूक भावनांचा त्यांच्या आवेगानें चक्काचूर होऊन गेला.

परंतु शेठाणीला मात्र वर्षाच्या आंत नातवाचें दर्शन घडलें.

पण, जयंताचा जन्म हा कांचनच्या वैवाहिक जीवनाचा अंत, त्या शृंगाराच्या उधाणाचा शेवटला क्षण ठरला. त्यानंतर पांच वर्षांत तिला आणखी तीन मुलें झालीं. पण, रतिलालची तिच्या विषयींची आसक्ति जी तेव्हांपासून कमी झाली, ती मात्र कायमचीच. त्याच्या नव्या मैत्रिणी किंवा सलगींतल्या गायिका आतां पूर्वीप्रमाणें मधून मधून घरीं येऊं लागल्या. कांचनला स्वतःच्या इच्छेविरुद्ध त्यांच्याशी आतिथ्यबुद्धीनें वागावें लागे; व तो

फारच प्यालेला असला, म्हणजे त्या मैत्रीचें आणि गायनाभिरुचीचें खरें स्वरूपहि केव्हां केव्हां तिच्या नजरेला येई.

त्यामुळें रतिलालविषयीं जो उबग त्याच्या पहिल्या एकांत भेटीच्या प्रसंगीं तिच्या मनांत उत्पन्न झाला होता, तो सारखा वाढतच गेला. इतका कीं, घरीं येणाऱ्या त्याच्या मैत्रिणींच्या चाळ्यांकडे ती ज्या विरक्ततेनें दुर्लक्ष करी, तिचा बड्या शेठाणीला मनस्वी राग येई आणि ती तिला वारंवार म्हणे—

"तूं जर रतीला या वेळीं आवरला नाहींस, तर तो पुन्हा कधीं लागायचा नाहीं तुझ्या हातीं — "

पण कांचननें सासूच्या त्या रागाकडे आणि वैतागाकडेहि दुर्लक्ष केलें. रतिलालच्या जीवनाशीं आपला जणुं कांहीं संबंध नाहीं, अशाच भावनेनें ती वागे; व त्याची एखादे वेळीं तिच्या सहवासांत रहावयाची लहर लागली, म्हणजे ती भोगाची बिगार कांचन उदास मनानें सहन करीत असे.

सासूच्या आणि आपल्या वैवाहिक जीवनाची ती परवड पाहून तिच्या मनांत येई, घड लागल्यावर केळ जशी कापून टाकतात, तशी संतति झाल्यावर स्त्रीला का नाहीं कापून टाकीत? म्हणजे पुढलें तें अपमानित, निष्फळ जिणें तरी तिच्या कपाळचें टळेल—

नवऱ्याचा तो स्वैराचार पाहून जरी तिचें मन आंतल्या आंत जळे, तरी तो आपला मनस्ताप एका शब्दानेंहि तिनें कधीं व्यक्त केला नाहीं.

पण, तिनें प्रेमस्वरूप स्वामींचा उपदेश घेतल्यावर जेव्हां रतिलालनें एकदां तिच्या स्वामीजींवरील भक्तीचा कुचाळीनें उल्लेख केला, तेव्हां मात्र ती रागानें उद्गारली—

"तुम्ही स्वतः जसे आहांत, तशींच इतर माणसं दिसतात तुम्हांला. तुम्ही कुणाबरोबर कुठं जातां याची चुकून तरी चौकशी करतें का मी कधीं? मग तेंच स्वातंत्र्य तुम्ही मला का देऊं नये?—"

"तूं भलत्याच स्वातंत्र्याची अपेक्षा करतेस, कांचन! किती झालं, तरी स्त्री ती स्त्री आणि पुरुष तो पुरुष—"

"हा तुमचा नियम इतर सामान्य स्त्रियांना लागू असेल. मला नाहीं—"

"तूं स्वतःला असामान्य समजण्याजोगं काय आहे तुझ्यांत एवढं?—"

"तें तुम्हींच स्वतःच्या मनाला विचारून पहा. तुम्ही इतक्या स्त्रियांचा अनुभव घेतलेला आहे आजवर की, मी त्यांच्यापेक्षां निराळी आहे कीं नाहीं हें तुमचं स्वतःचं मनच सांगूं शकेल तुम्हाला चांगल्या रीतीनं—"

"जिला आपल्या असामान्यत्वाची इतकी घमेंड आहे, तिनं लग्नाच्या पाशांत जखडून घ्यायला नको होतं स्वतःला—"

"मी लग्न का न् कोणत्या परिस्थितींत केलं, हें माहित आहे तुम्हाला चांगलं. शिवाय मी खरोखरीच लग्नाच्या पाशांत

जखडलेली आहे असं वाटतं का तुम्हाला ? तुम्हांला कधीं आठवतंय कां मी तुमची वाट पाह्यल्याचं, चौकशी केल्याचं किंवा तुमच्यापासून कांहीं अपेक्षिल्याचं ?—"

तिच्या त्या प्रश्नानें तो चिडला आणि उद्गारला—

"कांचन, तुझं मन तरवारीच्या पात्यासारखं आहे. जो त्याला नाजूक समजून हाताळायला जाईल, त्याला रक्तबंबाळ व्हावं लागेल—"

"माझं मन मूळचं तसं होतं असं वाटत नाहीं मला. त्याला इतकी तीक्ष्ण धार यायला तुम्ही स्वतःच कारण आहांत खरोखरी—"

प्रेमस्वरूप स्वामींचं त्या वेळीं मुंबईला फार माहात्म्य माजलें होतें. स्वामींचा रुबाब, वक्तृत्व, मनोमोहन, अंतर्ज्ञान आणि नजरानजर होतांच समाधि लावण्याची कला या गुणांमुळें त्यांनीं सुशिक्षितांवरहि आपली छाप उत्तम बसविली होती. ते स्वतःला प्रेममार्गी म्हणजे परमात्मा प्रेमस्वरूप आणि जगत प्रेममय आहे या तत्वाचे प्रवर्तक म्हणवीत. आपल्या या तत्वाचं विवरण करण्यासाठीं त्यांनीं संस्कृतांत एक उपनिषद लिहून तें इंग्रजी भाष्यासह प्रसिद्ध केलें होतें. ते अमेरिकेहून दिग्विजय करून परत आले, त्या वेळीं प्रेमलीला आणि प्रेममयी या दोन गौरकाय शिष्या त्यांच्या बरोबर असल्यामुळें, लोकांना ते दुसरे विवेकानंदच वाटले; व मुंबईच्या संपन्न वर्गांतील रिकामटेकड्या चोचलेखोर स्त्रीपुरुषांना त्यांची प्रवचनें, अंतरंग मंडळांतील (Inner Circle) संभाषणें, पूर्व जन्माची ओळख वगैरे गोष्टी हा एक नवा बुद्धिविलासाचा विषय होऊन बसला.

पण, स्वामीजींवर कांचन लुब्ध झाली, ती मात्र केवळ त्यांच्या आकर्षक व्यक्तित्वामुळें नव्हे; तर पहिल्याच भेटींत संमोहित करून तिची मनोव्यथा ज्या सहृदयतेनें त्यांनीं तिच्या तोंडून वदवली आणि नंतर तिला ज्या प्रेमानें दिलासा दिला, त्यामुळें तिची त्यांच्यावर भक्ति जडली. ते तिला वारंवार म्हणावयाचे, "माझ्या या दोन आवडत्या शिष्यिणींपेक्षांहि तुझा पूर्व जन्मींचा अधिकार मोठा आहे; व माझें जीवितकार्य तुझ्या हातून पूर्ण होणार, असा ईश्वरी संकेत दिसतो. पण, तूं स्वतः मात्र आपल्या अधिकाराचें ज्ञान करून घेण्यासाठीं कडक तपस्या केली पाहिजेस—"

त्या तपस्येसाठींच कांचननें मांसाहार सोडला.

स्वामीजी तिला आपल्यासमोर बसवून समाधिस्थितीचा जो अनुभव देत, त्यामुळें तिच्या मनावरील भार हलका होऊन, तिला एक प्रकारची प्रसन्नता वाटे. प्रथम प्रथम ही समाधि केव्हां पंधरा मिनिटें, तर केव्हां अर्धा तास टिकत असे; व त्या वेळीं त्यांच्या युरोपियन शिष्यांपैकीं कोणीतरी एक तिथें हजर असावयाची.

पण एक दिवस स्वामीजी तिला म्हणाले, " कांचन, तूं आतां सर्व मर्यादा सोडून समाधीची पुढली अवस्था गांठली पाहिजेस—"

" सर्व मर्यादा सोडायच्या म्हणजे काय करायचं, महाराज ?—"

" पहिली मर्यादा कालाची. आतांपर्यंत जास्तींत जास्त अर्धा तासपर्यंत तूं समाधिस्थितींत रहात आली आहेस. पण यापुढें तूं वेळेचं बंधन झुगारून द्यायला हवंस. एरवीं तुला परमात्म्याच्या प्रेमस्वरूपाचा साक्षात्कार होणार नाहीं. आणि अशी समाधि एकान्तांतच लावली पाहिजे—"

" एकांतांत ? म्हणजे आपल्या मदतीशिवाय समाधि लावण्याचा प्रयत्न करायचा मी ?—"

" वेडे, मी हजर असल्यानं एकांताला बाध येत नाहीं. गुरु आणि शिष्य हे अभिन्न आणि एकरूप आहेत अध्यात्मिक दृष्टीनं. शिवाय समाधिस्थितींतहि मीच तुझ्या आत्म्याला सर्व कोशांतून बाहेर काढून कैवल्याचा मार्ग दाखविणार—"

स्वामीजी हंसून म्हणाले.

पण तो दीर्घकालिक एकान्त समाधीची कल्पना कांचनला कशीशीच वाटली. म्हणून ती स्वामीजींना कांहीं म्हणणार, तोंच ते बोलले—

" अशा प्रकारची दीर्घ काल समाधि लावण्याचा अभ्यास केल्याशिवाय तुला आपल्या पूर्व जन्माचं ज्ञान होणार नाहीं, कांचन—"

" पूर्व जन्माच्या ज्ञानाचा आणि समाधीचा काय संबंध, महाराज ?—"

" पूर्वज्ञान आणि अंतर्ज्ञान हीं दोन्हीं समाधीनंच प्राप्त होतात, कांचन. समाधिस्थितींत दीर्घ काल राहिल्यावर आपल्या आत्म्यावरतीं या जन्मींच्या संस्कारांचीं, कर्मांचीं, स्मृतींचीं वगैरे जीं आवरणें चढलेलीं असतात, तीं सगळीं एकामागून एक गळून पडतात आणि अशा रीतीनें शुद्ध, निर्विकल्प झालेला केवलात्मा हा दिव्य सुपर्णाप्रमाणें मग भूत आणि भविष्य यांत स्वेच्छेनें संचार करूं शकतो—"

पूर्वजन्मज्ञानाची ही कल्पना कांचनला मोहक वाटली; व तिनें एकान्त समाधिस्थितीचा अनुभव घेण्याचें ठरविलें.

प्रेमस्वरूप स्वामींची समाधीची पद्धत अगदीं साधी असे. ज्या व्यक्तीचा समाधी लावावयाची, त्या व्यक्तीला ते पद्मासन घालून आपल्यासमोर बसवीत; व आपल्या प्रखर तेजाळ दृष्टींत त्या शिष्याला किंवा शिष्यिणीला आपली दृष्टि मिसळावयाला सांगत. गुरुशिष्यांचें अशा रीतीनें तारकामीलन झाल्यावर कांहीं मिनिटांतच त्या व्यक्तीचे डोळे मिटत आणि तिचें देहभान नष्ट होत असे. त्या अवस्थेंत स्वामीजी त्या व्यक्तीशीं जें बोलत, आणि तिला जें कांहीं करावयाला सांगत, त्याचें कांहींहि स्मरण तिला त्या अवस्थेंतून बाहेर आल्यावर उरत नसे. फक्त आपल्या श्रान्त गात्रांना आणि त्रस्त मनाला एक प्रकारची विश्रांति आणि शांति मिळाली, एवढें मात्र मागाहून त्या व्यक्तीला वाटे.

कांचनच्या एकांत समाधीचा काळ पहिल्या दिवशीं स्वामीजींनीं फक्त पांच मिनिटांनीं वाढविला. अशा रीतीनें सात दिवस क्रमाक्रमानें समाधिकाल वाढवीत गेल्यावर आठव्या दिवशीं सायकाळीं जेव्हां ती तासाभरानें देहास्थितीवर आली, तेव्हां तिला असें वाटलें की, स्वामीजी ज्या विशिष्ट चंदनाची उटी आपल्या अंगाला लावतात, त्याचा उद्दाम गंध आपल्या भोंवतीं दरवळला आहे, आपल्या शरीराला आणि कपड्यांना येत आहे. त्यामुळें ती अस्वस्थ झाली आणि दुसऱ्या दिवशीं सकाळीं स्वामीजींना म्हणाली—

"या समाधिमुळं पूर्व जन्माचं ज्ञान होईल, असं म्हणालां होतांत आपण. पण आतां आठ दिवस होऊन गेले, तरी समाधि

उतरल्यावर मला कोणत्याच प्रकारचं विशेष ज्ञान झाल्यासारखं वाटत नाहीं — ”

“ किती उतावळी आहेस तूं, कांचन ! इतक्या सहजासहजीं का कुठं आत्म्याभोंवतालचीं आवरण गळून पडत असतात ? ही समाधि म्हणजे अनुष्ठान आहे एक. तें पूर्ण झाल्यावर तुला ज्ञान होईल पूर्व जन्माचं--”

“ म्हणजे किती दिवस लागतील आणखी ?

“ आपण प्रतिपदेला सुरवात केली आहे. पूर्णिमेच्या मध्य-रात्रीं सर्व देहभान गळून जाऊन आत्मा केवल स्वरूपाला पोंचल्यावर तुझ्या हृदयांत पूर्व स्थितीच्या ज्ञानाचा उदय होईल हळुहळू—”

“ पूर्णिमेचा आणि या समाधीचा संबंध काय ?—”

“ चंद्र हा मनाचा स्वामी आहे. शिवाय स्त्रीदेह हा चंद्राच्या प्रभुत्वाखालीं आहे. म्हणून पूर्णिमेच्या उत्तर रात्रीं पूर्व जन्माचं प्रथम ज्ञान होईल तुला—”

“ म्हणजे त्या दिवशीं सायंकाळीं मी जी समाधि लावायची, ती उत्तर रात्रीं उतरेल म्हणतां ?—”

“ हो. पण त्या वेळीं ज्या आनंदाची प्रतीति तुला होईल, ती केवळ स्वसंवेद्य आहे, कांचन ! पुष्पावांचून सुगंध, प्रकाशा-वाचून तेज आणि नादावांचून संगीत यांच्या दिव्य ऊर्मींवर आत्मा हेलावत राहील तुझा ! त्या आनंदाची अनुभूति एकदां

घेतल्यावर तुला हा जन्म आणि या जन्मांतील लौकिकादि ईषणा तुच्छ वाटतील न् त्या आनंदाशिवाय दुसरं कांहींहि सेव्य वाटणार नाहीं—”

“ मी समाधिस्थितींत असतांना आपण माझ्याशीं कांहीं बोलता का ?—”

“ हो तुझ्या आत्म्यावरलीं सगळीं आवरणं गळून पडून तो निर्विकल्प, केवल व्हावा, म्हणून मी सूचक बोलतों मधून मधून त्याच्याशीं—”

“ पण, मला तर त्यांतलं कांहीं आठवत नाहीं मागाहून—”

“ कसं आठवेल ? समाधिस्थितींतलं दोन आत्म्यांचं संभाषण आणि संमीलन आहे तें. हें तादात्म्य प्रत्येक दिवशीं जस-जसं वाढत जाईल, तसतसा तुझा आत्मा मुक्त आणि केवल होईल—”

आपण समाधिस्थितींत असतांना स्वामीजी आपल्याशीं जें बोलतात, त्याची आठवण नंतर आपल्याला होऊं नये, ही गोष्ट कांचनला कशीशीच वाटली.

पण ती कांहीं बोलली नाहीं.

त्यानंतर एकादशीच्या दिवशीं सायंकाळीं स्वामीजींनी समाधि जरा उशीरानें लावली व ती उतरवयाला पूर्ण दोन तास लागले.

ती दीर्घकालीन समाधि उतरल्यावर कांचनला जर प्रथम कोणती गोष्ट जाणवली असेल, तर ती ही कीं, स्वामीजी स्वतःच्या कपाळाला जो चंदनाचा दाट लेप लावीत असत, त्याचा चुरा आपल्या केसांवर पडला आहे.

तो चुरा हाताला लागतांच तिच्या मनांत येऊं नये त्या शंका आल्या. पण स्वामीजींशीं त्यासंबंधीं एका अवाक्षरानेंहि न बोलतां ती मुकाट्यानें घरीं परत आली आणि तिनें निश्चय केला कीं, पुन्हा त्यांच्याकडे जावयाचें नाहीं.

पण तो निश्चय पाळणें सोपें नव्हतें.

दिवसभर तिला विशेष कांहीं वाटलें नाहीं. पण, जसजसा दिवस कलत गेला, तसतशी तिच्या मनाला विलक्षण ओढ लागली आणि शेवटीं ती रोजच्या वेळेवर स्वामीजींच्या दर्शनाला गेली.

पण समाधि लावण्याचा प्रसंग मात्र तिनें कांहीं तरी निमित्त साधून टाळला.

स्वामीजींनीं तिला कोणत्याहि प्रकारचा आग्रह केला नाहीं किंवा उत्सुकताहि दाखविली नाहीं. पण तिची ती साशंकता आणि अवस्थता मात्र ते जाळें लावून बसलेल्या फांसेपारध्याच्या जिज्ञासेनें न्याहाळीत होते.

दोन दिवस अशा बेचैन स्थितींत काढल्यावर कांचननें ठरवलें कीं, मुंबईला जोंपर्यंत आपण रहात आहोंत, तोंपर्यंत स्वामीजींचा

मोह कांहीं आपण तोडूं शकणार नाहीं. आणि ती मुलांना घेऊन गांवीं आली.

तरीहि तिच्या मनाला स्वस्थता लाभली नाहीं.

संध्याकाळ झाली म्हणजे तिचें मन कावरेंबावरें होई, कसली तरी विलक्षण ओढ मनाला लागे आणि कोणते तरी अदृश्य पाश आपल्याला ओढीत आहेत, असें तिला वाटे. ती रात्रीं अंथरुणावर पडली, म्हणजे खोलींतल्या त्या अंधारांत स्वामीजींचे ते प्रखर, तेजाळ डोळे तिला दिसत, त्या डोळ्यांतून निघणाऱ्या किरणशलाका आपल्याला चहूंबाजूंनीं वेढीत आहेत असें तिला भासे—

तिनें दिवा ठेवून निजण्याचा प्रयत्न केला, म्हणजे ताटकळलेल्या डोळ्यांवर जी मधूनच कांहीं वेळ सुस्तीची झांपड पडे, तींतहि तिला स्वामीजींचे ते आपल्यावर रोखलेले तेजाळ डोळे दिसत.

दिवसा तिचा वेळ कसा तरी जाई. पण संध्येच्या लांबच लांब सावल्या भोंवतीं पसरूं लागल्या, आणि त्या सावल्यांतून निघालेली निशेची निबिड काळोखी विश्वाला गिळूं लागली, म्हणजे तिच्या जिवाचा थरकांप होत असे. घरांतल्या दीपज्योति आणि आकाशांतल्या दिव्यज्योति म्हणजे तिला स्वामीजींचे ते जिकडे नजर टाकावी तिकडे दिसणारे तेजाळ डोळे वाटत आणि त्या डोळयांतून बाहेर पडणारे प्रखर किरण आपल्या आत्म्याला, खुणावीत, बोलावीत, खेचून बाहेर ओढीत आहेत, असा तिला भास होई—

अखेर तिला निद्रानाशाचा विकार जडला आणि आपल्याला वेड लागतें कीं काय असें तिला वाटूं लागलें.

पण आपली ही विलक्षण मनःस्थिति तिनें कोणाला बोलून दाखविली नाहीं. इतकेंच नव्हे, तर रतिलाल जेव्हां तिला एक दिवस म्हणाला—

" कांचन, स्वामींचा नाद सुटलेला दिसतोय तुझा अलिकडे ? "

तेव्हां ती शांतपणं त्याला म्हणाली—

" तुमची चूक आहे. तो नाद नव्हताच मुळीं. स्वामीं-कडून आपल्याला कांहीं अध्यात्माची अनुभूति होईल असं मला वाटलं न् म्हणून जात होतें मी त्यांच्याकडे—"

" मग बिघडलं कुठं ?—"

" बिघडलं नाहीं कांहींच. आपल्याला त्यांचा मार्ग परवडणार नाहीं असं मला वाटलं आणि मी सोडून दिलं त्यांच्याकडे जाणं—"

" पण, तुझ्या प्रकृतीवर फार परिणाम झालेला दिसतोय त्याचा—"

" माझ्या प्रकृतीवर परिणाम होण्यासारख्या इतक्या गोष्टी घडताहेत आपल्या घरांत माझं लग्न झाल्या दिवसापासून कीं, मी इतके दिवस जिवंत कशी राहिलें याचंच नवल वाटायला हव तुम्हाला खरोखरी—"

तिचें तें उत्तर ऐकून रतिलालला संताप आला. पण तो कांहीं बोलला नाहीं.

त्या नंतर उन्हाळा सुरू होतांच ती जी मुलांना घेऊन काश्मीरला गेली, ती रतिलाल आजारी पडल्याची तार आल्यावर मुंबईला परत आली.

त्याच्या मृत्यूनें ती लग्नबंधनांतून मुक्त झाली. पण गृहबंधन मात्र अजून तुटलें नव्हतें. पण तेंहि तुटण्याचा योग ती गांवीं असतांना एक दिवस अचानक आला.

रतिलाल वारल्यावर ती मुलांसह तेथें येऊन राहिली होती. मुंबई तिला आतां अगदीं नकोशी झाली होती. पण त्या वेळीं दुसऱ्या एखाद्या रम्य ठिकाणीं जाऊन राहणें बरें दिसलें नसतें. म्हणून ती मुलांना घेऊन गांवीं येऊन राहिली.

नदीकांठच्या त्या मोठ्या बंगल्यांत ती रहात असतांनाच थोरले शेठजी कांहीं कामानिमित्त म्हणून तेथें आले. रतिलालच्या मृत्यूपासून ती त्यांच्यासमोर कधीं जात नसे; व मुंबईप्रमाणें या बंगल्यांतहि तिची व्यवस्था अगदीं निराळी असल्यामुळें तिला इथेंहि त्यांच्यासमोर जाण्याची गरज पडली नाहीं.

त्या दिवशीं रात्रीं ती नेहमीप्रमाणें बगीचांतून हिंडून परत आली आणि निजण्याच्या विचारांत होती. तोंच घोगऱ्या आवाजांत कोणी तरी आपल्याला हांक मारल्याचा तिला भास झाला.

म्हणून तिनें चटकन् टेबलावरला टॉर्च उचलला आणि दार उघडलें.

तों शेठजी समोर उभे.

ती दारांतच उभी राहिली.

त्यांनीं तिच्याकडे पाहून हास्य केलें आणि घोगऱ्या आवाजांत ते म्हणाले—

" मला या वेळीं इथं आलेला पाहून तुला नवल वाटलं असेल नाहीं ? पण तुझ्या खोलीत इतक्या उशीरां दिवा दिसला म्हणून पाह्यला आलों मी मुद्दाम—"

त्यांची ती हंसण्याची तऱ्हा आणि तो घोगरा आवाज दोन्हीं तिला आवडलीं नाहींत. पण तिनें मर्यादेनं त्यांना म्हटलें—

" मी आतांच बगीचांतून फिरून परत आलें न् निजायच्या तयारीत होतें—"

आपल्या लठ्ठ, आंखूड बोटांतील गोमेदाची अंगठी वरखाली करीत शेठजी म्हणाले—

" तूं एकटी कां राहतेस इथं ? हें वय एकट्यानं रहाण्याचं नाहीं. मला माहित आहे, रतिलालनं तुला कांहीं सुख दिलं नाहीं. माथेरानला आपला बंगला आहे. तिथं तूं रहा. मी येत जाईन दर शनिवारीं मुलांना पाह्यला—"

त्यांनीं तिच्याकडे पाहून पुन्हा हास्य केलें.

पण ती कांहींच बोलली नाहीं.

त्यामुळें उत्तेजन येऊनच कीं काय ते पुढें म्हणाले—

" मीहि आतां कंटाळलों आहे मुंबईला. पण माथेरानला एकट्यानं जाऊन राह्यचं जिवावर येतं—"

बोलतां बोलतां ते थोडे पुढें सरकले.

पण ती द्वारांतून हलली नाहीं.

तेव्हां त्यांनीं हात पुढें केला..

त्याबरोबर ती संतापानें उद्गारली—

" मला कोण समजलांत तुह्मी ? पलिकडल्या बाजूला चौकीदार निजला आहे. जास्त गडबड कराल, तर त्याला हांक मारावी लागेल मला—"

तिचे ते शब्द कडकडतच त्यांच्या कानांवर आदळले—

आणि ते थोडे मागें हटून म्हणाले—

" चौकीदाराची भीति कोणाला दाखवतेस ? तो कांहीं बेइमान नाहीं आपल्या मालकाच्या अंगावर उलटायला. आणि त्याला काय माहित नाहीं का तूं कशी आहेस तें ? नवरा जिवंत असतांना त्या स्वामीकडे रात्रीं दहा दहा वाजेपर्यंत जाऊन बसणारी तूं !— अख्ख्या मुंबईत बोभाटा झाला होता तुझ्या त्या गुरुभक्तीचा. त्या तुझ्या कर्मामुळंच तर हाय खाल्ली रतिलालनं—"

त्यांनीं उच्चारलेलें तें शेवटलें वाक्य कानांवर पडतांच तिचें सगळें भान नष्ट झालें आणि आपल्या हातांतली टॉर्च तिनें त्यांच्या अंगावर उगारली.

त्याबरोबर ते झटकन् बाजूला झाले आणि अत्यंत तुच्छतेनें हंसून तिला म्हणाले—

"मी पूर्ण ओळखून आहे तुला. तूं खूनसुद्धां करायला चुकायची नाहींस माझा. रतीला फशीं पाडून त्याच्या इस्टेटीसाठीं तूं लग्न केलंस त्याच्याशीं. आतां मीच एक कांटा उरलोय तुझ्या मार्गांत. पण, लक्षांत ठव, तूं जोपर्यंत सरळ होणार नाहींस, तोंपर्यंत सुखानें अन्न खाऊं देणार नाहीं मी तुला--"

आाण ते अंधारांत नाहींसे झाले.

ती दार लाऊन आंत आली.

सासऱ्याच्या विषयलंपटतेचे अनेक प्रकार तिनें ऐकले होते. तिची सासू रोज जेवतांना तिला आपल्या दुःखाचें पुराण ऐकवीत असे. पण, आज जो हा प्रकार घडला, त्यानें तिला आपल्या मस्तकावर आकाश कोसळल्यासारखें न् पायाखालची धरणी दुभंगल्या-सारखें वाटलें—

आपली प्रत्यक्ष सून, आपल्या एकुलत्या एका मुलाची विधवा, आपल्या चार पोरक्या नातवंडांची अभागी आई—! जिच्या नवरा मेल्याला अद्याप पुरते चार महिनेहि झालेले नव्हते!— तिला अपरात्रीं एकटी गांठून तिच्याशीं हें वर्तन! माणसें विषयलंपट झालीं, म्हणून काय तीं इतकीं दुष्ट, इतकीं नीच होतात?

ती सारी रात्र तिनें तळमळत, विचार करण्यांत घालवली.

आणि दोन महिन्यांच्या आंतच तिनें स्वतःच्या वडलांच्या मदतीनें आपली सगळी स्वतंत्र व्यवस्था करून घेतली.

पण, ती स्वतंत्र झाली, तरी तिच्या मागला शेठजींचा ससेमिरा कांहीं सुटला नाहीं. ती मुंबईला असली काय, गांवीं गेली काय किंवा अन्यत्र कुठें जाऊन राहिली काय, त्यांचीं माणसें सारखीं तिच्या पाळतीवर असावयाचीं आणि तिला सतावून सोडण्यासाठीं ते स्वतः फोनचा दुरुपयोग करीत, तो वेगळाच. तिला साधल्यास दुर्वर्तनी ठरवावें आणि मुलें आपल्या ताब्यांत घ्यावींत, म्हणून त्यांनीं कांहींहि करावयाचें शिल्लक ठेवलें नाहीं.

त्या पद्धतशीर छळाला ती अगदीं कंटाळून गेली होती. पण, त्या छळाविरुद्ध कुठें शब्द काढण्याची सोय नव्हती आणि त्याला आळा घालण्याचाहि कांहीं उपाय नव्हता—इतका तो छळ सूक्ष्म आणि अप्रत्यक्ष होता.

हें सगळें तिच्या मनात आलें आणि तिला वाटलें, आजपर्यंत मुकाट्यानें भोगलेल्या त्या छळाचा पाढा काय आतां या नवख्या मुशाफरापुढें वाचावयाचा? त्याचा आणि आपला काय संबंध? आणि ही घृणास्पद कथा त्याला सांगून तरी काय फायदा! नवऱ्यानें आणि सासऱ्यानें आपल्यावर केलेले किळसवाणे आरोप, स्वतःच्या हृदयाच्या त्या सार्‍या वहात्या जखमा!— त्या या घडीभराच्या सहचराला उघड्या करून दाखविण्यांत काय स्वारस्य आहे?

आपण लग्नाची हकीकत त्याला सांगितली, तीच मुळीं चूक केली.

पण चूक तरी कशी म्हणावी? आजपर्यंत गेल्या सात आठ वर्षांच्या आपल्या सार्वजनिक आयुष्यांत कितीतरी स्त्रीपुरुष आपल्याला भेटले, त्यांच्याशीं आपला स्नेहसंबंधहि झाला आणि त्यांच्या-

पैकीं कांहींबरोबर आपण अनेक दिवस एकत्रहि राहिलों आहोंत. पण त्यांपैकीं कोणालाहि आपली मनोव्यथा जाणवली नाहीं, आपल्या हृदयाची निर्गाठ दिसली सुद्धां नाहीं.

आणि हा मुशाफर तरुण !— यानें नेमका त्या निर्गाठीवर हात ठेवला. जग जिला सुखवैभवांत लोळणारी चैनी, चोचलेखोर विधवा समजत आलें, त्या आपली मनोव्यथा या अनोळखी मुशाफरानें अचूक ओळखली. त्याच्यापाशीं हृदय मोकळें करून जर गेलीं सोळा वर्षें भोगलेला हा दुर्वह जीवनभार हलका करावयाचा नाहीं, तर आतां बोलावयाचें तरी कोणाशीं ?

आजपर्यंत जुन्या गोष्टी आठवून तिनें एकान्तांतसुद्धां कधीं अश्रु गाळले नव्हते. मनाचें तें स्मृतिकपाट तिनें जणुं कायमचें बंद करून टाकलें होतें. पूर्वजन्मींच्या संचिताचे परिणाम मनुष्य भोगीत असला, तरी त्याची आठवण किंवा जाणीव जशी त्याला अजिबात नसते, तशी अवस्था झाली होती जणुं या बाबतींत तिच्या मनाची.

पण, आज त्या आठवणींचं मनांत उठलेलें काहूर तिला असह्य झालें आणि तिच्या डोळ्यांतून अश्रूंच्या धारा वाहूं लागल्या.



तीं दोघें फिरावयाला निघालीं, त्या वेळीं सूर्य क्षितिजावर झपाट्यानें उतरत होता; व पूर्वेला चंद्राचें पूर्णप्राय बिम्ब हळुहळू

वर चढत होतें. वाळून विरलेलें पान उन्हांत वर धरलें असतां जशी त्याची प्रत्येक रेषा न् रेषा दिसावी, तसे त्या निष्प्रभ चंद्रबिंबावरले सगळे डाग स्पष्ट दिसत होते. मावळत्या शरत्सूर्याच्या अरुणप्रभेचे पराग हवेंत सर्वत्र उधळलेले असल्यामुळें आंब्याच्या आणि मोहाच्या दाट काळसर पर्णभागाला सुद्धां निराळीच कांति आली होती.

त्या सोनेरी सुखोष्ण उन्हांत तिचा हिरवा पोषाख फार सुंदर दिसत होता. जरीच्या काठाच्या असलेली फिक्या हिरव्या रंगाची रेशमी साडी ती नेसली होती; व पायांत जे कलाबतूचें काम केलेले हिरवे सँडल तिनें घातले होते, त्यांतून तिच्या लाल नाजूक टांचा हिरव्यागार दळांतून बाहेर डोकावणाऱ्या कमळाच्या आरक्त कळ्यासारख्या दिसत होत्या. शुभ्र सुवर्णाच्या (Platinum) तारेंत गुंफलेलीं जेडचीं हिरवीं कर्णकुंडलें तिनें कानांत घातलीं होतीं. सिंगापूरला असलेल्या तिच्या एका डॉक्टर मित्रानें वाढ-दिवसाची भेट म्हणून तो चिनी कर्णकुंडलांचा जोड नुकताच तिला पाठविला होता.

त्यानें पांढऱ्या शुभ्र तुमानीवर अर्धबाह्यांची तंग जर्सी घातली होती; व हातांत जी चामड्याच्या मुठीची छोटी काठी घेतली होती, तिचा प्रयोग तो मधून मधून अंगाला झोंबणाऱ्या झाडांच्या फांद्यांवर करीत होता.

त्यांच्यापुढें उड्या मारीत चाललेला जिम स्वारींच्या मागून धांवत होता.

वातावरण अगदीं शांत होतें. झाडांच्या दाट पानांतून विलक्षण कलकल करीत घरट्यांत शिरण्याच्या गडबडींत असलेले पक्षी किंवा

सोत्कंठ आवाज करीत आकाशांतून उडत जाणारी बगळयांची रांग यांच्याकडून होणारा त्या शांततेचा भंग, गाण्यांतील खर्जाच्या स्वरासारखा, मनाला उत्सुक करित होता.

" आपण सूर्य मावळेपर्यंत टेकडीवर हिंडू न् मग तलावाच्या पायऱ्यांवर जाऊन बसूं—"

" का ? तुम्हाला इतका फिरायचा कंटाळा आहे का ?—"

" फिरायचा कंटाळा आहे असं नाहीं. पण या उन्हानं तापलेल्या टेकडीवर फिरण्यापेक्षां चांदणं पडल्यावर गमसागरावर जाऊन बसणं जास्त सुखावह होईल—"

ती हसून म्हणाली.

पण तिच्या तोंडावर श्रांतता स्पष्ट दिसत होती.

म्हणून त्यानें म्हटलें—

" ठीक आहे. थोडा वेळ फिरून मग तलावावर जाऊन बसूं—"

दुपारीं अर्ध्यावरच आणून सोडलेली तिची जीवनकहाणी ऐकण्याची त्याला विलक्षण उत्कंठा होती. पण तिच्या डोळयांच्या कोपऱ्यांना आलेला लालपणा आणि त्यांच्याभोंवतीं पडलेलीं फुगीर काळीं वर्तुळें तिला झालेल्या मनस्तापाची साक्ष देत होतीं. त्यामुळें तिला कांहींच विचारण्याचा हिय्या त्याला होईना. पण रस्त्यानें मुकाट्यानें चालणेंहि त्याला बरें वाटेना. म्हणून त्यानें अखेर विचारलें—

" तुमचीं मुलं बरोबर असतात का नेहमीं तुमच्या ?—"

" हो. जगांत तेवढाच एक विरंगुळा आहे मला. माझा थोरला मुलगा डूनच्या लष्करी विद्यालयांत न् धाकटा नाशिकच्या लष्करी शाळेंत असतो. मुली मात्र माझ्या जवळ रहातात नेहमीं—"

" तुमच्या मागं संसाराचा व्याप आहे न् निरनिराळ्या संस्थांतहि काम करतां तुह्मी. तरी विसर पडत नाहीं तुह्माला आपल्या परिस्थितीचा !—"

" तीं कामं म्हणजे करमणूक आहे निव्वळ एक. निरनिराळ्या संस्थांचे चालक माझ्याकडे येतात ते पैशाच्या लोभानं; न् मलाहि रिकामटेकडा वेळ घालवायला साधन हवं म्हणून मी त्या संस्थांचा अध्यक्ष किंवा उपाध्यक्ष होतें. पण, त्या कार्यांत इतकं कांहीं सामर्थ्य नाहीं कीं, जें माझें मन व्यापून टाकून त्याला भोंवतालच्या परिस्थितीचा विसर पाडील. मला पुष्कळदां वाटतं कीं, आपल्या धर्मांत जी पूर्व संचिताची कल्पना आहे, ती बरोबर असो वा नसो, पण या आयुष्यांतलं संचित मात्र आपला जन्मभर पाठपुरावा करतं—"

" तुमच्या गुरूंनीं तुह्माला हें ज्ञान दिलं का ?—"

" छे ! हें ज्ञान द्यायला गुरु कशाला हवेत ? माझ्या मनालाच तें गेल्या सोळा वर्षांच्या अनुभवानं झालं आहे. पतीच्या मरणानंतर मी स्वतंत्र होईन, असं वाटलं होतं मला. मी एकटी असतें, मुलाबाळांचा पाश माझ्यामागं नसता, तर कदाचित् मी सुटलें असतें विवाहामुळं उत्पन्न झालेल्या परिस्थितीच्या तावडींतून. पण मुलांसाठीं मला पैशाकडे पहावं लागलं आणि मुलं न् पैसा यांच्यामुळं मी अडकून पडलें आहे या कोंडींत. मुलं हा वैवाहिक जीवनाचा वारसा. त्यामुळं वैधव्य

येऊनहि संसाराचा भोग सुटला नाहीं. पत्नी आणि माता या दोन्ही नात्यांच्या जबाबदारीचं ओझं मरेपर्यंत वहावं लागणार आहे मला—"

"पण हें ओझं संसारांत पडलेल्या प्रत्येकच स्त्रीला वहावं लागतं नाहीं कां? त्याबद्दल कुरकूर करून कसं चालेल?—"

"मी कुरकूर करित नाहीं. फक्त वस्तुस्थिति सांगतें. स्त्री आणि परुष यांच्यांत जर कांहीं फरक असेल, तर तो हा कीं, निसर्गानं जीवन-सातत्याची सगळी जबाबदारी स्त्रीवर टाकली आहे. पुरुष संसारांत राहूनहि स्वतंत्र असतो. पण संसारी स्त्रीला निसर्गानंच मुळीं स्वातंत्र्य नाकारलं आहे. सृष्टीच्या सातत्याचं आणि संसाराचं ओझं वाहाण्या-साठींच जणु स्त्रीचा जन्म आहे—"

"तुम्ही फार कडवटपणानं बोलतां आहांत स्त्रीजन्माविषयीं —'

"कां बोलूं नये? मी जिवंत असतांना माझ्या पतींची चैन कधीं थांबली नाहीं. पण जगाच्या दृष्टीनं मी आज स्वतंत्र आणि संपन्न असूनसुद्धां मला मात्र कोणत्याहि प्रकारचं स्वातंत्र्य घेतां येत नाहीं. आपल्या प्रत्येक कृत्याचा मुलांच्या जीवनावर काय परिणाम होईल हा विचार क्षणोक्षणीं मला अडवतो. खरोखरी पुरुष हा स्वतःसाठीं जगतो. पण स्त्री ही मात्र पुढल्या पिढीसाठीं जगत असते—"

"मला वाटतं, तुम्ही स्वतःच्या कल्पनेनं उगाच ओझं फुगवलंय आपल्या जबाबदारीचं. तुमच्या परिस्थितींतल्या कितीतरी स्त्रिया मी चैनींत आयुष्य घालवतांना पाहिल्या आहेत—"

"खरं आहे तुमचं म्हणणं. समाजांतील सुसंस्कृत समजल्या जाणाऱ्या संपन्न वर्गाच्या वरच्या श्रेणींत अशा सुखविलासी चंडोल

स्त्रिया फार दृष्टीला पडतात आलिकडे आणि मलाहि त्यांपैकींच एक समजतात पुष्कळ लोक! पण अशा भोगलोलुप स्त्रियांचं जीवन खरोखरीच सुखी असतं का? त्या जीवनांत चहाण्यासारखं कांहीं खरोखरीच असतं का? पापापुण्याच्या आणि नीतिअनीतीच्या जुन्या रूढ कल्पना जरी सोडून दिल्या, तरी आपल्या मुलाबाळांना, आपल्या भोंवतालच्या माणसांना आपल्याविषयीं आदर वाटेल, असं तरी वर्तन असायला नको का आपलं? आपल्या भोंवतालच्या माणसांनीं आपल्याविषयीं तुच्छतेनं बोलावं, आपल्या मुलाबाळांना आपल्याविषयीं आदर वाटूं नये, ही स्थिति कोणत्या स्वाभिमानी, कोणत्या खरोखरी सुसंस्कृत स्त्रीला रुचेल? माझ्या मुलांनीं साशंक नजरेनं आणि तिरस्कारानं माझ्याकडे पहाण्यापेक्षां मरण पुरेल मला तरी! — "

"तुमच्या या कल्पनांमुळंच तुह्मी कोंडमारा करून घेतला आहे स्वतःचा — "

"ह्रो. पण सुखाच्या लालसेपेक्षां ज्यांना कर्तव्य आणि जबाबदारी यांचं महत्त्व जास्त वाटतं, त्यांच्या आयुष्याचा नेहमींच कोंडमारा होतो नाहीं तरी — "

"मग तुह्मी मनाला लावून का घेतां इतकं सगळं?—"

"त्याचं कारण आहे. मी इतक्या कांटेकोरपणानं वागूनहि मला सुखानं अन्न खाऊं देत नाहींत माझे पूर्वजन्मींचे दावेदार!—"

तिनें तें वाक्य इतक्या त्वेषानें उच्चारलें कीं, तो विषय पुढं चालविण्यांत स्वारस्य नाहीं असें त्याला वाटलें आणि त्यानें तिला विचारलें —

" तुह्मी मघांशीं आपल्या गुरूंविषयीं सांगणार होतात मला — "

" हो. आपण रामसागरावर जाऊं या आतां. तिथं गेल्या-वर सांगतें मी पुढली हकीकत तुह्मांला — "

आणि ती लगेच परत फिरली.

सूर्य आतां बुडाला होता. फक्त त्याच्या प्रभेनें उजळलेल्या पश्चिम क्षितिजावर एका काळसर ढगाच्या आडून त्याच्या परावर्तित किरणांचे फवारे, कारंजाच्या धारांप्रमाणें, वर उसळले होते. शुद्धीवर येत असलेल्या मूर्च्छिताच्या विवर्ण चेहऱ्यावर जसें रक्त खेळूं लागावें, तशी त्या निस्तेज चंद्रबिम्बांत हळुहळू सुषमा भरत चालली होती; व त्या प्रमाणांत तें बिम्ब आकुंचित होत चाललें होतें. वातावरणांतील प्रत्येक अणुरेणु, झाडाचें प्रत्येक पान न् पान आणि ठिकठिकाणीं वाळून पिवळें पडत चाललेलें डोंगरपठारावरील गवत त्या तेजोरसांत न्हाऊन प्रसन्न दिसत होतें.

पलिकडल्या मैदानांत जीं छोटीं छोटीं गांवें पाणवठ्याच्या आश्रयानें दोन तीन मैलांच्या अंतरावर वसलीं होतीं, त्या गावांतल्या झोंपड्यांतून निघणाऱ्या धुराच्या लहान लहान सर्पाकृति वेटोळ्यांचा तवंग खालच्या सखल हवेंत पसरत होता. ठिकठिकाणचीं तळीं आणि पानमळे मात्र त्या सायंप्रकाशांत अद्यापहि चकाकत होते.

तीं दोघें झपाट्यानें चालत रामसागराकडे आलीं आणि पाण्या-लगत असलेल्या पायऱ्यांवर बसलीं. इतका वेळ त्यांच्यापुढें धांवत, उड्या मारित चाललेल्या जिमला मात्र हा नवा कार्यक्रम आवडला

नाहीं. तो पाण्यांत बुडालेल्या पायरीवर जाऊन उभा राहिला आणि शेपटीचा गोंडा हलवीत आपल्या धन्याकडे पाहत त्यानें चमत्कारिक लाडका आवाज काढला.

त्याची अपेक्षा अशी होती कीं, तो खुणेचा आवाज ऐकतांच आपला धनी नेहमींप्रमाणें आपल्याला पाण्यांत उडी टाकावयाला सांगेल.

पण त्याच्या त्या चाळ्यांकडे धनंजयचें मुळीं लक्षच गेलें नाहीं. तो आपल्याच विचारांत व्यग्र होता.

आपल्या शेपटीचा गोंडा हलवीत जिम त्याच्याकडे उत्सुकतेनें पहात होता. शेवटीं तो कंटाळून थोडा वेळ गुरगुरला आणि उडी मारून झाडींत नाहींसा झाला.

क्षितिजावरलें तें किंचित् अपुरें चंद्रबिम्ब आतां तेजानें गरगरून पिवळें पिवळें दिसत होतें. त्याचा सौम्य प्रकाश तलावाच्या सपाटीवर पडला होता; व झोपेंत असलेल्या तान्हुल्याच्या छातीप्रमाणें तें चकाकणारें पाणी सारखें खालींवर होत होतें.

कांचन अगदीं स्तब्ध होती. तें दृश्य पहातां पहातां तिचे डोळे पाण्यानें भरून आले.

तिच्या मनांत आलें, सोळा वर्षांपूर्वीं याच जागीं, याच वेळीं आपले डोळे पाण्यानें भरून आले होते. तेव्हां रतिलालनें आपले हात धरून आपल्याला विचारलें—

" कांचन, असं काय करतेस ? कुणाची आठवण झाली तुला इथं आल्यावर ? — "

त्या वेळीं कुणाचीहि आठवण आपल्याला झाली नव्हती. आपले डोळे अगदीं अकारण भरून आले होते. पण आज, आज ? —

तोंच धनंजयनें तिनें गुढग्यांवर अंजली करून ठेवलेले हात एकदम धरले आणि तिला म्हटलें —

" तुझी निष्कारण कोंडमारा करून घेतलाय आपल्या मनाचा—"

त्याच्या त्या अनपेक्षित स्पर्शानें ती दचकली. पण तिनें त्याच्या हातांतून आपले हात सोडवून घेतले नाहींत किंवा कोणत्याहि प्रकारची उत्सुकताहि तिच्या वृत्तींत उत्पन्न झाली नाहीं.

फक्त तिच्या डोळ्यांतून अश्रु ठिबकूं लागले.

कांहीं वेळानें ती त्याला म्हणाली—

" धनंजय, आज मी घरून चांगल्या मुहूर्तावर निघालें नाहीं असं वाटतं मला ?—"

" कां बरं ? — "

" मी आजवर ज्या गोष्टी कुणाशीं कधीं बोललें नाहीं, त्या तुमच्याशीं बोलतें आहे मी मघांपासून—

" पण त्यांत वाईट काय आहे ?—"

" वाईट इतकंच आहे कीं, माझा स्वतःच्या मनावरला ताबा आज सुटलाय—"

" आपलं दुःख दुसऱ्याला सांगणं म्हणजे स्वतःच्या मनावरला ताबा सुटणं आहे असं वाटतं का तुझाला ?—"

" हो. आपलं दुःख दुसऱ्याला सांगून मन हलकं करावसं वाटणं हा मानसिक दुबळेपणाचाच प्रकार आहे एक—"

" छे ! कांहीं तरीच समजूत आहे तुमची ही. तुझीं माझ्याशीं या गोष्टी बोलल्यानं काय नुकसान होणार आहे तुमचं ?—"

" तुझी व्यापारी असल्यामुळं व्यावहारिक नफा नुकसान पहातां, धनंजय ! पण मी आजच्या या प्रकाराचा विचार करतें, तो मागल्या पुढल्या सगळ्या गोष्टी लक्षांत घेऊन करतें आहे. मी आजपर्यंत अशा रीतीनं कुणाशीं वागलें नाहीं, कुणाच्या आहारीं कधीं गेलें नाहीं. म्हणून मला वाटतंय कीं, आज आपलं मन एकाएकीं दुबळं झालंय. रक्तदाब असह्य झाल्यामुळं जशी मेंदूची शीर अकस्मात् तुटून मनुष्य एकदम कोसळून खालीं पडावा, तशी झाली आहे आज माझ्या मनाची अवस्था—"

तो कांहीं बोलला नाहीं.

त्याच्या हातांत असलेले तिचे ते मृदुमांसल हात थरथरत होते.

कांहीं वेळानें आपले हात सोडवून घेऊन ती म्हणाली, " मी मघांशीं अर्ध्यावर सोडलेली हकीकत पुरी करतें आतां—"

आणि तिनें प्रेमस्वरूप स्वामींचा आपल्याला आलेला अनुभव, रतिलाल वारल्यावर सासऱ्यानें आपल्याशीं केलेला अतिप्रसंग, नंतर

आपण त्याच्याशीं करून घेतलेली कायदेशीर फारकत वगैरे सगळ्या गोष्टी त्याला सांगितल्या.

तो मुकाट्यानें ऐकत होता.

ती त्वेषानें त्याला ती सगळी घृणास्पद कहाणी सांगत होती.

तें सगळें सांगून झाल्यावर एक उसासा टाकून ती म्हणाली—

" माझी हकीकत ऐकायची म्हणजे मानवी स्वभावांतली सगळी दुष्टता आणि नीचता यांचं प्रदर्शन पाहाण्यासारखं होतं. समाजाच्या अगदीं वरच्या श्रेणींतली संभावित, सुसंस्कृत न् उदार समजलीं जाणारीं माणसं किती उलट्या काळजाचीं असतात, याचा मासला आहे तो एक. ती हकीकत सांगणारालाहि लाज न् दुःख आणि ऐकणारालाहि लाज न् दुःख. म्हणूनच मी तुम्हांला म्हणत होतें कीं, ही रामकहाणी सांगण्याचा आग्रह करूं नका तुह्मी मला. पण तुह्मी हट्टी न् मनस्वी आहांत, धनंजय. तुह्मी अखेर सांगायला लावलंत सगळं कांही मला "—

त्यानें पुन्हा तिचे हात आपल्या हातांत घेतलं आणि तो ह्मणाला —

" मला असं वाटतं, तुह्मी फार चांगल्या आहांत. त्याचा हा सगळा दुष्परिणाम आहे. या जगांत फार चांगलं राहून निभत नाहीं — "

" मग मी वाईट व्हावं ह्मणतां यापुढं ? — "

तिनें हंसून विचारलें आणि ती उठून उभी राहिली.

" छे ! मुद्दाम वाईट होण्याचीहि गरज नाहीं. फक्त तुह्मी आपल्यांतला फाजील चांगुलपणा तेवढा काढून टाका. तुह्मी हसूं नका. मी मनापासून बोलतों आहे अगदीं. जगानं कधींच कुणाच्या निर्मळ चांगुलपणाचं चीज केलेलं नाहीं आजवर -- "

त्याचा तो उद्गार ऐकतांच तिनें त्याच्याकडे डोळे विस्फारून पाहिलें आणि त्याला विचारलें —

" धनंजय, तुह्मी ह्मणतां तें खरं आहे. पण, आपण जें चांगलं राह्यचं, तें स्वतःच्या समाधानासाठीं कीं जगानं भलं ह्मणावं ह्मणून ? — "

" दोन्ही उद्देशांनीं. तुह्मी इतक्या चांगल्या आहांत, तरी जग तुमच्याकडे शंकेखोरपणानं पहातंच ना ? मग उपयोग काय तुमच्या चांगुलपणाचा ? — "

" जगाला उपयोग नसेल, पण मला आहे. मी चांगली आहे असं जोंपर्यंत मला स्वतःला वाटतंय, तोंपर्यंत निदान माझं मन तरी मला खाणार नाहीं. आणि तेंच समाधान मी मुख्य समजतें. त्या समाधानांत जो निर्भयतेचा आनंद आहे त्याचं मोल प्राणांची किंमत देऊन सुद्धां करतां येणार नाहीं, धनंजय !— "

ते शब्द उच्चारतांना तिच्या डोळ्यांत एकदम उफाळलेली लकाकी पाहून तो क्षणैक दिपून गेला.

पण लगेच ती अगदीं सौम्य आवाजांत म्हणाली—

" पण मला सुद्धां केव्हां केव्हां वाटतं कीं, या सगळ्या बोलायच्या गोष्टी आहेत, धनंजय. तुम्ही म्हणतां तेंच खरं. जगाचे आघात सोशीत आपलं चांगुलपण टिकवायला फार किंमत द्यावी लागते—"

" ती किंमत तुम्ही इतके दिवस दिलीत, तेवढी पुरे झाली असं नाहीं का वाटत आतां तुम्हांला ?—"

तिच्या त्या खेदपूर्ण उद्गारानें तो भानावर येऊन म्हणाला.

जणुं कांहीं तिच्यांतला तो दिव्यांश लुप्त झाल्यामुळें त्याला धीर आला आणि त्यानें म्हटलें—

" आपण ज्याला चांगुलपणा म्हणतों, तो सापेक्ष आहे. निर्भयतेंत, स्वतःच्या मनाशीं प्रामाणिक असण्यांत एक प्रकारचा आनंद आहे, यांत शंकाच नाहीं. पण त्या आनंदासाठीं काय आपल्या जीवनाचा कोंडमारा करून घ्यायचा ? सगळा जन्म काय एकाकी पिंजण्यांत घालवायचा ? तुमच्या या विचित्र कल्पनांमुळच तुम्ही स्वतःला दुःखी करून घेतलं आहे—"

ती कांहीं बोलली नाहीं. आपले डोळे पुन्हा भरून येत आहेत, असें तिला वाटलें आणि ती हळुहळू पायऱ्या चढावयाला लागली.

त्यानें मागें पाहिलें—

जिम कुठेंच दिसेना.

म्हणून त्यानें शीळ घालून हांक मारली.

“ जिम्, जिम् — ”

त्याबरोबर सशाचें पिलूं तोंडांत धरलेला जिम झाडींतून धांवत त्याच्यापुढें आला. त्याच्या तोंडांतल्या त्या लोळागोळा झालेल्या पिलाच्या रक्ताचे थेंब भुईवर ठिबकत होते.

“ हें काय केलंस गाढवा ! — ”

त्यानें रागानें त्या कुत्र्याला ह्मटलें.

त्याबरोबर वरच्या पायरीवर असलेल्या कांचननें मागें वळून पाहिलें आणि तिच्या तोंडून उद्गार निघाला—

“ अरेरे ! यापेक्षां आपण तलावावर आलों नसतों तर बरं झालं असतं — ”

जिमनें तें अर्धमेलें पिलूं तिथेंच पायरीवर टाकलें आणि तो उड्या मारित त्या दोघांच्यापुढें धांवला.

दोघेंहि अगदीं स्तब्ध होतीं.

वर अंगणांत येतांच एकदम सुवासाचा दरवळ वाऱ्याच्या झुळकेबरोबर त्यांच्या अंगावर आला. तेव्हां त्यानें विचारलें —

“ कसला विलक्षण सुवास आहे हा एवढा ? — ”

“ चित्रांगाचीं तीं तांबडीं पांढरीं फुलं दिसताहेत ना, त्यांचा सुवास आहे हा — ”

“ पण दुपारीं जेव्हां मी या फुलांचे घोस तोडले, तेव्हां मुळींसुद्धां वास येत नव्हता त्यांना — ”

“ त्या फुलांना फक्त रात्रींच वास येतो; न् तो इतका मादक असतो कीं, मन अगदीं बेचैन होऊन जातं त्याच्या दर्पानं — ”

तीं दोघें कमानीजवळ येतांच चित्रांगाच्या फुलांचे ते पांढरे तांबडे झुबके हिऱ्यामाणकांच्या घोसांसारखे त्या चांदण्यांत चमकतांना त्यांना दिसले. त्यानें त्या फुलांचे तीन चार घोस तोडले आणि ते ओंजळींत घेऊन त्यांचा वास घेत तो तिच्या खोलींत आला.

ती खिडकीजवळ उभी होती; व खिडकीच्या खालीं जीं निशिगंधाचीं सोळा पाकळ्यांचीं टपोरीं पांढरीं शुभ्र फुलें आपला उद्दाम गंध वाऱ्यावर उधळीत होतीं, त्यांच्याकडे पहात होती.

पलिकडे रामसागराचा अथांग रम्य विस्तार चंद्रप्रकाशांत अगदीं शांत दिसत होता.

तो हळूच तिच्या मागें येऊन उभा राहिला.

तिच्या डोळ्यांतून अश्रु ठिबकत होते.

खिडकीच्या कट्ट्यावर ठेवलेले तिचे हात त्यानें हळूच आपल्या हातांत घेतले.

त्याबरोबर ती आर्तरवानें उद्गारली—

“ नको, नको, धनंजय ! मला एकटीलाच राहूं द्या आतां — ”

## ७

कांचन हळूच त्याच्या जवळून उठली आणि बाहेर अंगणांत आली.

चंद्र आतां पश्चिम क्षितिजावर उतरला होता; व त्याच्या त्या तिरप्या चांदण्यांत झाडांच्या लांबच लांब सांवल्या एकमेकांत मिसळून जाऊन अंगणांत सर्वत्र अंधार पसरला होता.

फुलांच्या सुगंधाचा दरवळ हवेंत अद्याप कायम होता. पण त्याच्यांतली मादकता मात्र आतां लोपून गेली होती.

डाकबंगल्याभोंवती पसरलेल्या त्या भयाण, काळोखी शांततेचा भंग रामसागराच्या लाटांचा आवाज सारखा करित होता. सगळी सृष्टि या वेळीं साखरझोंपेंत होती. फक्त रामसागराचें अथांग पाणी मात्र सारखें थाड थाड करित होतें.

जणुं धरित्रीच्या विशाल हृदयाची ती धडधड अखंड कानांवर येत होती.

कांचननें तोंडावर आलेले केस मागें सारले आणि ती पायऱ्या झराझर उतरून तलावाच्या कांठीं आली.

रामसागराच्या अर्ध्या अधिक भागावर गडद काळोख पसरला होता; व पूर्वेकडल्या कोंपऱ्यांतील थोड्याशा भागावर चांदणें तळपत होतें. काळया माणसाच्या अंगावर जसा एखादा कोडाचा पांढरा पट्टा असावा, तशी ती तलावाची प्रकाशित बाजू दिसत होती.

तें चमत्कारिक दृश्य पाहून कांचनच्या मनांत आलें, काळोख हा केव्हांहि भयाणच. पण, निळया अथांग पाण्यावर जेव्हां तो पसरतो, तेव्हां मृत्यूची ही भीषण छायाच जणुं जीवनावर पसरली आहे, असें मनाला वाटतें.

पाणी सारखें थाड थाड करित होतें आणि तिच्या मस्तकांतहि त्या एकच एक प्रश्नाचा घण सारखा घाव घालीत होता.

धनंजयच्या श्रांत गात्रांवर निद्रेची झांपड पडून तिच्या अंगाभोंवतालचा त्याचा बाहुपाश सैल होतांच त्याच्या स्पर्शसंमोहांतून तिचें मन बाहेर पडलें आणि तिच्या हृदयांत तो एकच एक प्रश्न खवळून उठला —

"आज आपल्या हातून हें काय घडलें ? —"

"रतिलालच्या मरणापासून गेलीं सात आठ वर्षे आपण किती रुबाबांत, किती दिमाखांत काढलीं आणि आज हें आपल्या हातून काय घडलें ? —"

आज घडलेला हा प्रकार कदाचित् कोणाच्या लक्षांतहि येणार नाहीं. कारण, तो मध्यरात्रीं सर्वत्र अगदीं सामसूम झाल्यावर

आपल्या खोलींत आला आणि पहांटे जाग आल्याबरोबर पुन्हा उठून स्वतःच्या खोलींत जाऊन निजेल.

चौकीदार आणि खानसामा यांच्या मनांत फार तर एवढेंच आलें असेल कीं, या बंगल्यावर तिऱ्हाईत इसम आलेला दृष्टीस पडतांच त्याच पावलीं परत जाणारी ही कांचनबाई आज रात्रीं इथें मुक्कामाला कशी राहिली ? पण, आपल्यावर, आपल्या चारित्र्यावर त्या दोघांची इतकी कांहीं श्रद्धा आहे कीं, एवढ्या एका शंके-पलिकडे त्यांच्या मनाची मजल बहुधा जाणार नाहीं.

पण त्यांच्या मनांत किल्मिष आलें नाहीं म्हणून काय झालें ? आपलें स्वतःचें मन, तरवारीच्या पात्यासारखें नाजूक पण तीक्ष्ण मन, तर साक्षीदार आहे ना या घडलेल्या प्रकाराला ? तें आप-ल्याला काय म्हणेल ?

शिवाय, आपण आणि हा मुंबईचा मुशाफर एक अहोरात्र या डाकबंगल्यावर होतों, एवढी साधी गोष्ट जरी त्या लाल अस्वलाच्या कानांवर गेली आणि त्याच्याकडून सदैव आपल्या मागावर असलेल्या त्या अधम सासऱ्याला कळली, तरी पुरे आहे. आजपर्यंत कधीं न ऐकलेले त्यांचे दुःशब्द यापुढें आपल्याला ऐकावे लागतील आणि आपलें मनहि आपल्याला म्हणेल कीं, हे दुःशब्द तूं आतां कशाच्या जोरावर सहन करणार ?

या स्थितींतून बाहेर पडण्याला, हा सगळा दुर्लौकिक टाळण्याला कांहींच का मार्ग नाहीं ? नाहीं कसा ? एक मार्ग

आहे आणि तो म्हणजे त्याच्याशीं तावडतोब पुनर्विवाह करण्याचा. पण या वयांत आपण पुनर्विवाह केला म्हणजे लोक काय म्हणतील? आणि आपल्या मुलांना तरी काय वाटेल? तीं आपल्याकडे कोणत्या दृष्टीनें पहातील? आपला लाडका जयंत, या दुरंत संसारांतला आपला तो एकमेव शूर आधार—त्याच्या मनांत आपल्याविषयीं काय येईल? आपल्याविषयीं त्याला किती प्रेम, किती आदर, किती अभिमान आहे! जगांतल्या सगळ्या सौंदर्याची आणि शुचितेची मूर्ति समजतो तो आपल्याला. गेल्या वर्षीं नाताळांत दारू पिऊन धुंद झालेला तो निमगोरा मॅनेजर सासऱ्याचा निरोप सांगण्याच्या निमित्तानें म्हणून रात्रीं आपल्या बंगल्यावर आला आणि आपल्याशीं बोलतांना त्यानें मर्यादा थोडी सोडली, तेव्हां त्याच्या अंगावर संतापानें हंटर घेऊन धांवलेला आपला लाडका जयंत!—काय वाटेल त्याला आपल्याविषयीं आपण पुनर्विवाह केला तर? मघांशींच आपण धनंजयला सांगितलें कीं, आपल्या मुलांनी आपल्याकडे साशंक नजरेनें आणि तिरस्कारानें पहाण्यापेक्षां मरण पुरवेल आपल्याला!—

मरण? होय मरणच. या चमत्कारिक परिस्थितींतून कायमचें बाहेर पडावयाला तेवढा एकच सुरक्षित, एकच सन्मान्य मार्ग आहे. अन्य कोणत्याहि मार्गानें आपण गेलों, तर आपल्या कपाळचे दुःशब्द, आपल्या नशिबींचा दुर्लौकिक टळणार नाहीं.

सोळा वर्षांपूर्वीं या डाकबंगल्यावरून परत गेल्यावर आपण रतिलालशीं लग्न केलें आणि दुर्लौकिकाची भीति कायमची टाळली. पण, आतां या वयांत जर पुन्हा त्याच मार्गानें आपण गेलों, तर

दुर्लौकिक टळणार नाहीं, उलट वाढेल मात्र. म्हणून तो मार्ग सुरक्षित नाहीं आणि सन्मान्य तर नाहींच नाहीं.

पण मरणानें तरी हा दुर्लौकिक खरोखरच टळेल का ? आपण आत्महत्या केल्यावर उद्यां लोक आपल्याविषयीं नाना कल्पना करतील आणि नाना प्रकारें बोलतील. खुद्द आपल्या मुलांना तरी काय वाटेल ? जयंताच्या मनांत काय येईल ? आपलें कलंकित तोंड जगाला दाखविण्याची शरम वाटल्यामुळेंच आपल्या आईनें जीव दिला असेंच त्याला वाटणार नाहीं का ? किंवा स्वतःच्या हातून मोहाच्या भरांत घडलेल्या प्रमादाचें प्रायश्चित्त आपल्या मानी, बाणेदार मातेनें प्राणांच्या मोलानें दिलें म्हणून त्याला आपल्याविषयीं धन्यता वाटेल ?

त्याला कांहींहि वाटो, लोक कांहींहि म्हणोत. जिथें कोणाचाहि दुःशब्द कानावर येणार नाहीं आणि कोणाच्याहि साशंक नजरेचा आघात सहन करावा लागणार नाहीं, असा मार्ग फक्त एकच आहे. तो मार्ग आत्मनिर्वाणाचा !

आपल्या आयुष्यांतले हे दोन्हीं लाजिरवाणे प्रसंग या राम-सागरानें पाहिले आहेत आणि त्यांच्यावर कायमचें पांघरूणहि पण तोच घालूं शकेल. पण, त्याच्या ज्या या अथांग पाण्यांत आजवर आपण मनसोक्त विहार केला, त्या या पाण्यांत आपल्याला सुखासुखी कायमचा आसरा घेतां येईल का ?

का घेतां येऊं नये ? ज्या समाधींत योगी ब्रह्मानंदाचा दिव्य अनुभव घेतात, त्याच समाधींत प्राणांचा विलय करून स्वतःची जीवनज्योत स्वतःच्या हातांनीं मालवून ते मुक्त होत नाहींत काय ? मग जलविहार करतां करतां आपल्याला आत्मनिर्वाण करणें का साधं नये ?

हा विचार मनांत येतांच ती दोन पायऱ्या खालीं उतरून पाण्या-जवळ आली आणि पाण्यांत शिरण्यासाठीं तिनें आपले हात पुढें केले.

तोंच आपला खांद्यावरून खालीं झुकलेला पदर कोणी तरी ओढीत असल्याचा तिला भास झाला आणि तिनें चमकून मागें पाहिलें—

जिमनें तिचा पदर आपल्या तोंडांत धरला होता.

तिनें मागें वळून त्याला झटदिशीं वर उचलला आणि त्याच्या दृष्टींत आपली दृष्टि मिसळली. त्या मुक्या प्राण्याची ती सावध नजर कोणत्या तरी आर्त आशंकेनें आपल्याकडे पहात आहे, आपल्या हृदयाचा ठाव घेत आहे, असें तिला वाटलें आणि तिनें त्याला गदगदां हलवून म्हटलें—

"जिम्, तूं कशाला आलास माझ्यामागून वेड्या इथं! जा, आपल्या मालकाच्या पायांपाशीं जाऊन नीज —"

तिच्या तोंडून तो उद्गार निघतांच जिमनें जीभ थोडीशी बाहेर काढली आणि नंतर अगदीं केविलवाणा असा खोल चम-त्कारिक आवाज काढला. जणुं कांहीं ती आपल्याला कायमची सोडून जाण्याच्या विचारांत आहे, हें त्या मुक्या, इमानी प्राण्याला मनोमन कळलें.

त्याचा तो केविलवाणा आवाज तिच्या काळजाला कापीतच गेला आणि त्याला हृदयाशीं घट्ट धरून ती पायऱ्यांवरून उड्या मारित वर आली.

खोलीचें दार उघडेंच होतें.

ती हळूच आंत गेली आणि जिमला त्याच्या पायांजवळ तिनें हातांनीं थोपटून निजवलें.

त्या मुक्या प्राण्याच्या केसाळ छातीवर हात ठेवतांच त्याच्या काळजाची धडधड तिला जाणवली आणि आपलें सगळें अवसान खचून जाईल कीं काय, असें भय तिच्या मनाला वाटलें.

त्याचा धनी मात्र स्वस्थ घोरत होता.

ती हळूच उठली.

त्याबरोबर जिमहि डोकें वर उचलून तिच्याकडे पाहूं लागला.

तेव्हां तिनें डोळे वटारल्यासारखें केलें आणि नाकावर बोट ठेऊन त्याच्याकडे पाहिलें.

आणि ती झटकन् दारापाशीं आली.

जिम जागचा हालला नाहीं. पण तो सारखा तिच्याकडे टक लावून पहात होता.

तिला सारखें वाटत होतें कीं, हा चौपाईवरून उडी मारून पुन्हा आपल्या पाठोपाठ येतो कीं काय ?

पण त्याची नजर जरी तिच्यावर खिळली होती, तरी तो जाग्यावरून मात्र हालला नाहीं.

तिनें दार घट्ट ओढून घेतलें आणि ती झराझर पायऱ्या उतरून पाण्याजवळ आली.

पूर्वेकडल्या कोपऱ्यांत जें चांदणें मघाशीं पाण्यावर तळपत होतें, तेंहि आतां पार लोपून गेलें होतें.

सर्वत्र भयाण काळोख आणि त्याच्याशीं एकरूप झालेलें तें काळेभोर पाणी.

ती आणखी चार पायऱ्या खालीं उतरली आणि तिनें हळूच पाण्यांत प्रवेश केला.

पाणी थाड थाड करित होतें.

रामनवमी, १९४२ शांतानिवास, नागपूर

